# ए, आपण चहा घ्यायचा ?

## (दोन अंकी नाटक)

**चं. प्र. देशपांडे**

## अंक पहिला

रवी ( ३५ ) या सरकारी अधिकाऱ्याचा फ्लॅट. समोर जरा उजव्या हाताला प्रवेशव्दार. टेलिफोन, शोभेसे फर्निचर, एक मोठे निसर्गदृश्य असलेले चित्र टांगलेले. त्याची पत्नी प्रभा ( ३० ).संध्याकाळची वेळ. रवी वर्तमानपत्र चाळत बसलेला. काही क्षणानी वर्तमानपत्र बाजूला धरतो आणि प्रेक्षकांशी बोलायला लागतो. बोलण्याच्या ओघात नंतर वर्तमानपत्र ठेवून देतो.

रवी : तुम्ही ' नटसम्राट ' म्हणा किंवा काही जुनी नाटकं म्हणा पाहिली असतीलच. त्यांत कशी स्वगतं वगैरे असायची लक्षात आहे ना ? तसंच हे माझं ! आलं, आलं, तुमचं ऑब्जेक्शन लगेच माझ्या लक्षात आलं ! स्वगतं कशी राजेमहाराजे, निरनिराळ्या क्षेत्रांतले सम्राट यांना शोभून दिसतात.माझ्यासारख्या एका साध्या सरकारी अधिकाऱ्याचं स्वगत हे मनाला पटत नाही -- हेच ना ? माझ्यासारख्या सामान्य माणसाचे कसले एवढे उत्तुंग विचार असणार आहेत ? आणि नसतीलच तर मग स्वगत कशाला ? मलाही हे मान्य आहे की ती स्वगतं कशी अभिनयाला आव्हान वगैरे असायची ! एकदा उंचावर उभं राहून, एकदा खाली येऊन, एकदा समोर येऊन, एकदा वर बघत आणि या सगळ्यांबरोबर आवाजाचे चढउतार करत असं बरंच काही भावनिक आणि वैचारिक प्रक्षोभाचं ते बोलायचे ! प्रॉब्लेमच तसे उत्तुंग असायचे ना त्यांचे ! म्हटलं तर माझा प्रॉब्लेम मला उत्तुंगच आहे की, पण त्या तुलनेनं -- बिगर उत्तुंग ! माझ्या स्वगतात अभिनयाला फार वाव नाही हे मला मान्य आहे. याचं कारण काय तर मूड एकच -- वैताग ! असं असलं तरी आता मी जरा एका वेगळ्याच विचारात आहे, कळेलच तुम्हाला हळूहळू ! दरम्यान मी हिला चहा करायला सांगितलाय पण ही म्हणजे माझी बायको प्रभा याला दुय्यम महत्त्व देणार. आधी ती तिच्या हातातली दुसरी किरकोळ कामं करणार आणि मग चहा करणार. जरा थांबू या. आलीच ती. (कपबशीचा आवाज येतो. -- काही क्षणांनी प्रभा येते. हिच्या हालचाली उगीचच चपळ, काहीतरी उरकून टाकायचे आहे असे वागणे. तिच्या आवाजात नेहमी विचित्रपणा. पीडित, अन्यायित, तक्रारखोर, चिडका आवाज. आपल्याला सतत निष्कारण कसलातरी त्रास होतो आहे ही भावना. ती चहाची कपबशी घेऊन येते.)

प्रभा ( कपबशी एकदाची रवीपुढे ठेवून ) घ्या ! ( आत जाते. डाव्या हाताला. )

रवी ( ती गेल्यावर - प्रेक्षकांशी स्वगत संवाद-) आता घेतो मी हा चहा -- पण खरं म्हणजे ही कपबशी आणि चहा मी खिडकीतून खाली भिरकावून द्यायला पाहिजे. पण विचार असा करावा लागतो की नुकसान कुणाचं होणार ? आपलंच ! चारचौघांत तमाशा कुणाचा होणार ? आपलाच ! बरं, समजा असा प्रसंग एकदा घडवलाच तर त्यातून काही अक्कल शिकण्याची शक्यता ? नाही ! म्हणून मग आपलं पिऊन टाकायचा ! ( चहा पितो. कपबशी ठेवून -- ) ती " घ्या !" कसं म्हणाली पाहिलंत नं ? म्हणजे त्याच्यापुढचा न उच्चारलेला पण ऐकू येणारा शब्द कुठला ? -- " गिळा " ! हे घर माझंच आहे, पण या घरात अक्षरशः मी काही खातपीत नाही. गिळतो.... फार प्रयत्न केला मी ... समजावून सांगून पाहिलं, चिडून पाहिलं, सगळं करून पाहिलं. पण फरक नाही. या आवाजात कायम एक चिडखोरपणा,आपल्यावर काहीतरी अन्याय होत असल्याची भावना आणि सारखं आपल्याला काहीतरी त्रास होतोय अशी भावना असते. ती जात नाही. जाऊ शकत नाही. तिला हेसुध्दा मी सांगितलेलं आहे की मानसशास्त्रज्ञांच्या मते माणसाचा स्वभाव बदलू शकतो. स्वभाव म्हणजे काही काळ्या दगडावरची रेघ नाही. आणि हा असला स्वभाव तर बदलायलाच पाहिजे. कारण तो वाईट आहे. मला तर असं वाटतं कधीकधी, बरं का, की हिची कवटी फोडावी, हिचा मेंदू बाहेर काढून सँडपेपरनं घासावा, मग एक तासभर पाण्यात ठेवून स्वच्छ धुवावा आणि मग ग्रीसिंग - ऑइलिंग वगैरे करून, मऊ आणि सौम्यसा करून परत बसवावा आणि कवटी पॅक करावी. हे काही मी करणार नाही-- करू शकणार नाही हा भाग वेगळा. पण असं

वाटतं,याच्यावरूनच माझं जीवन कसं चाललंय ते लक्षात येतं की नाही ?अहो, घरातून बाहेर पडेपर्यंत आणि घरात पाऊल पडलं की लगेच -- हे असलं वातावरण ! जगणं मुश्किल होतंय. जगता येईल का माणसाला ? जगणं शक्य तरी आहे का ? हे सगळं सहन करायची माझीसुध्दा लिमिट आता संपलेली आहे. हे आता अशक्य होऊन बसलेलं आहे. मग काय घटस्फोट ? मग मुलांचं काय करायचं ? त्यांच्या आयुष्याचं किती मातेरं होईल हा विचार करावा लागतो. आणि घटस्फोट वगैरे गोष्टींनासुध्दा थोडातरी दमदारपणा लागतो हो ! तोही नाहीय हिच्यात ! एकदम हलकं डोकं आहे ! वरनं उडी मारणं किंवा जाळून घेणं वगैरे असलं काहीतरी करेल ! म्हणजे भयानक सगळं ! ठीक आहे, नाही ना आपलं जमत, घटस्फोट घेऊन टाकू, दोघंही मोकळे -- असा शांतपणे मार्ग निघणारच नाही हो. आहे ग्रॅज्युएट पण माझं मत विचाराल तर बुध्दी नाही. सगळे मार्ग बंद. स्वभाव बदलणार नाही, तुम्ही काही करायचंही नाही, सहन तर केलंच पाहिजे आणि शिवाय तुमचं डोकं ठिकाणावर ठेवलंच पाहिजे ! जुलूम आहे साला ! कुणी म्हणेल की मी साधकबाधक विचार फार करतो. पटकन ॲक्शन घ्यायची. खरंच असं वाटतं कधीकधी की हिचं डोक धरून एका फटक्यात असा भिंतीवर नारळ फोडून टाकावा. पण पुढं काय ? ती मरणार, मी तुरुंगात जाणार. म्हणजे त्याचा काही उपयोग नाही. तर असा सगळा प्रॉब्लेम आहे. पण आता मात्र सगळं कडेलोटाला आल्यासारखं वाटतं मला. काही तरी उपाय पाहिजेच याच्यावर, नाहीतर अशक्य आहे. अहो, हे असं सगळा विचार करून आणि संयम ठेवून ठेवून माझी शीर तुटायची एखादी मेंदूतली ! म्हणजे हे सहन करून करून शेवटी समजा मी मॅड झालो तर एकूण नायनाटच की सगळा ! कसंही, काहीही म्हटलं तरी पुढं सगळं नाशाचंच चित्र आहे. करावं काय ? कुणी म्हणेल, एक बायको ती काय, आणि तिच्यामुळे सगळी आयुष्याला घरघर काय लावून घेताय ! ते बरोबर आहे, पण आजचं मरण उद्यावर एवढंच यातलं तत्त्वज्ञान ! यासाठी विचार ! पण हेसुध्दा आता फार दिवस चालेलसं वाटत नाही. काहीतरी उपाय काढावा लागणारच याच्यात ! नाहीतर नकळत तुकडा तरी पडेल. त्यात परत भानगड अशी की असा सगळा वैताग तयार व्हावा या हेतूनं ती असं वागते असं नाही. स्वभावच तो ! त्यामुळं तिची कीवसुध्दा येते कधीकधी ! असल्या स्वभावानं जगणं, तिलासुध्दा किती भयानक आहे ! डोक्यात टेन्शनच सतत ! कठीण आहे. पण यातनं सुटका ही व्हायलाच पाहिजे आता.(फोनची रिंग वाजते. ) असा फोनबिन आला की विचाराची लिंक तुटते बघा. ( फोन घेतो. ) हॅलो, कोण, हं, मिसेस मिस्त्री, बोला ! मिसेसशी बोलायचंय का ? सॉरी, एक मिनिट हं !( आत असलेल्या प्रभाला ) ए प्रभा, मिसेस मिस्त्रींचा फोन आहे. ( प्रभा उगीचच घाईनं येते, फोन घेते. )

प्रभाः ( फोनवर ) हॅलो, हं, बोल ! हं, आशिशचा का ? बरं, येईन. गुरुवारी संध्याकाळी नं, हं ! बरं, दोघांना जमलं तर येऊ पण मी तरी येईनच. हं ! अग, मीटिंगमध्ये काय झालं ? ( फोन बंद झालेला असतो. फोन आपटते. ) बंद केला मेलीनं ! शिष्टच आहे ! दोन शब्द पुढे बोलायला काय होतं ?

रवीः ती शिष्ट असल्यावर काय करणार ? शिष्टपणानं वागणं तिला भागच आहे. आपण कसे आहोत ते कोण बदलायला तयार असतं ?

प्रभाः कुठलाही विषय निघाला की कुजकं आणि घालूनपाडून बोलायची काही गरज नाही.

रवीः ठीक आहे. बास !

प्रभाः म्हणजे मी निष्कारण बडबडते असं दाखवायचंय तुम्हाला.

रवीः काय जे असेल ते -- पण बास !

प्रभाः सारखं असं तोंड बंद करायचं बघा तुम्ही ! तोंड दाबून बुक्क्याचा मार असलं आहे सगळं ! ( रवी गप्प. ) तिच्या मेलीच्या मुलाचा वाढदिवसही नेमका गुरुवारीच आलाय !

रवीः गुरुवारी जन्मतारीख येत असेल त्याची ! त्याला काय करणार ?

प्रभाः ते समजतं मला !

रवीः आणि समजा मंगळवारी आला असता तरी तू म्हणाली असतीस नेमका मंगळवारी आला ! प्रत्येक गोष्टीचा ज्याला त्रासच होतो त्याला कोण काय करणार ?

प्रभाः तुम्हाला माझ्या प्रत्येक गोष्टीचा त्रास होतो.

रवीः बरं, असेल.

प्रभाः असेल नाही, आहे.

रवीः तुला प्रत्येक गोष्टीचा त्रास होतो याचा मला त्रास होतो. मूळ तुझ्यात आहे. कितीही मोठा आवाज

परवडतो पण माणसाचा त्रासिकपणा मिसळलेल्या आवाजाइतकी घाणेरडी गोष्ट जगात कुठली नसेल.

प्रभाः अहो, पण असा का होतो माणसाचा आवाज ? कारणं असतात त्याला.

रवीः ( ओरडतो ) ती कारणं गेली गाढवाच्या.....मला आता हे सहन होणार नाही.

प्रभाः सारखं असंच बोलत राहा तुम्ही मला. असं सारखं बोलून माझा स्वभाव सुधारेल का बिघडेल ?

रवीः अरे, मग काय करावं काय ? गप बसलं तरी तुझं हे वाढतच चालतं, बोललं तरी वाढतच चालतं. वैताग आहे तिच्यायला !

प्रभाः मारून टाका मग मला !

रवीः अरे पण आपला स्वभाव घाणेरडा आहे, घरातल्या लोकांना त्याचा त्रास होतो तर तो बदलावा -- हा सरळ सोपा मार्ग नाही का दिसत ?नायनाट करायचेच मार्ग सुचतात तुला--मारून टाकून काय होणार ? तू जिवंत राहून जे भयानक परिणाम होणार तसेच तू मरून होणार.

प्रभाः मग शांतपणानं समजून घ्या मला.

रवीः अरे पण मला सहन नाही ना होत आता ! या असल्या समजून घेण्यानं मी मॅड झालो किंवा मला हार्टअॅटॅक आला तरी नायनाटच आहे ना ?

प्रभाः तुम्हाला नायनाटच दिसतो प्रत्येक गोष्टीत.

रवीः (ओरडून -- ) अरे पण चूक आहे का माझी ? साधं तुझा स्वभाव बदलणं आणि आवाज साधा करणं हा सरळ मार्ग का दिसत नाही तुला ?

प्रभाः तुमच्या अशा स्वभवामुळंच माझा स्वभाव असा झालाय. तुमचा स्वभाव बदलला की माझा आपोआप बदलेल.

रवीः म्हणजे काय केलं पाहिजे मी ?

प्रभाः नुसती वाचनाची आवड करायचीय काय ती ? हौसमौज नाही, कुठं जाणयेणं नाही, गप्पाटप्पा नाहीत, घरीपण कसले समारंभ नाहीत, साधा सत्यनारायणसुध्दा नाही. कुठं ट्रिपला जाणं नाही, कुठल्या नव्या वस्तू खरेदी करायची हौसही नाही. स्वतःहून कधी एखादी साडी आणलीय तुम्ही मला ? नुसतं नोकरी करून पोसताय तुम्ही आम्हाला-- हेच आमच्यावर उपकार झाले असं वाटतं तुम्हाला.

रवीः च्यायला, माझं डोकं आऊट झाल्याशिवाय थांबणार नाहीस तू.

प्रभाः उलट माझ्या या चिडचिडेपणामुळं माझ्याच डोक्याची खात्री वाटत नाही मला.

रवीः दोघंही मॅड होऊ या. म्हणजे भलं होईल सगळ्यांचं !

प्रभाः तुमच्या या दडपशाहीनं तेच व्हायचंय शेवटी ! ( रडत -- ) मुलं लहान होती तर मी कामात असताना मुलांना घेतसुध्दा नव्हतात तुम्ही ! इतकं करून पुन्हा मीच वाईट ( रडू लागते. )

रवीः आता रडून तमाशा करू नको. बास !

प्रभाः ( रडतच ) प्रत्येक गोष्टीत दडपशाही --

रवीः बरं नको वाद आणि तो आवाज म्हणून गप्प बसावं, दुर्लक्ष करावं - तर तुम्ही घरात असे तिरसटासारखे का वागता म्हणून सुरू होतं -- बोलावं तर हे असं होतं -- काय करावं काय ! तुझं डोकं असतं रिकामं, तुला नाही उद्योग - नाही कसली आवड -- चांगली पुस्तकं वाचावी, गाणी ऐकावी, भरतकामात इंटरेस्ट घ्यावा -- काही नाही तर निदान काही धार्मिक - अध्यात्मिक गोष्टींत तरी रस घ्यावा -- का Sही नाही ! बोंब नुसती !डोकी आपटत नुसता वेळ घालवायचा आणि आयुष्य संपवायचं !हे एक नशीबच आहे सालं !

प्रभाः ( रडत -- ) माझ्या वडिलांनी चूकच केली -- काही नीट चौकशी न करता स्थळ गळ्यात मारलं माझ्या ! ते मोकळे झाले ! मी बसलेय निस्तरत जन्मभर ....

रवीः आता रडू नको -- बास म्हणतोय तर ! निव्वळ वैताग आहे तिच्या मारी ! तू आता थांबणार आहेस का मी बाहेर जाऊ ? दमून, कंटाळून आल्यावर घर हे एक विश्रांतीचं स्थान असतं असं म्हणतात लोक ! हे म्हणजे सालं बिनविश्रांतीचं राबत जिवंत राहणं आहे ! बास आता बास -- आणि दहा वर्षांनंतर अजून लग्नाची चूकच चाललीय डोक्यात तुझ्या ! तू काय आनंदानं संसार करणार !

प्रभाः ( रडतच ) तुम्ही सतत खडे फोडत राहा माझ्या नावानं -- आणि म्हणे आनंदी राहा -- ( दारावरची बेल वाजते. प्रभा डोळे पुसत आत जाते. रवी दार उघडतो. विजय - ३० आणि संगीता -- २५ येतात.)

रवीः अरे ये - या - तुम्ही आहे होय ! मला वाटलं हमालच आला !

विजयः हमाल ? म्हणजे माझी एखाद्या हमालाशी तुलना वाटते तुला ?

रवीः अरे तसं नाही--माझ्याकडे एक खरोखरचा हमाल येणार आहे आत्ता -- मला वाटलं तोच आला का काय !

विजयः हमाल कशाला ? काय गावालाबिवाला चालला का काय कुठं ?

रवीः नाही रे -- दुसरं एक काम आहे. ते जाऊं दे !

विजयः संगीता, तुला म्हटलं नाही मी, इथे आलं की मजा येते -- काही ना काही नवीन असतं -- तासदोनतास कसे गेले कळत नाही.

संगीताः ( हिचे बोलणे नेहमी लाडिक. ) होय तर ! हे हमालाचं काय काढलंय रवीराव ! कळूं द्या तरी ! आणि प्रभा कुठं गेली ? ( एवढ्यात प्रभा येते -- ती आता फ्रेशपणा दाखवू शकते. )

प्रभाः अरे वा ! संगीता, ये,ये ! बसा नं ! आम्हीच तुमच्याकडे येऊ येऊ म्हणत होतो ते राहूनच जातंय बघ काही ना काही कारणानं. बरं झालं तुम्ही आलात ते!

संगीताः म्हणजे कारणं तरी काय घडली एवढी ? मुलं गेलीयत सुट्टीला मावशीकडे त्यामुळं तुमचा हनीमून चालू असेल !

प्रभाः कसलं काय गं ! हे मध्यंतरी गेले होते ऑफीसच्या कामाच्या दौऱ्यावर -- नंतर माझी जरा तब्बेत बरी नव्हती.

संगीताः बरं असूं दे - या पण एकदा -- भेटीगाठी होत राहिल्या की बरं वाटतं -- आणि हे हमालाचं काय आहे बाई तुमच्याकडे ?

विजयः रवी, सांगूनच टाक ते, कारण कुठलाही विषय अर्धवट सोडायची तुझी पध्दत नाही.

प्रभाः हमालाचं ? मला नाही माहीत.

रवीः अगं काही नाही, ऑफिसचं जुनं रेकॉर्ड हलवायचंय दुसरीकडे. ते ठरवायला बोलंवलंय त्याला. आधी माणसं ठरवलेली असली म्हणजे बरं असतं.

विजयः मग ऑफिसात बोलवायचं -- घरी कशाला ?

प्रभाः तेच म्हणते मी ! आणि मला काहीच बोलले नव्हते हे -- !

संगीताः आम्ही म्हणजे चकितच झालो अगं, म्हटलं हमाल कशाला यांच्या घरी ? विजय म्हणालासुध्दा की काय गावाला बिवाला जाताय काय म्हणून.

प्रभाः गावाला कसले जातोय गं आम्ही !

रवीः ( विजय अजून उत्सुकतेनं पाहतोय हे पाहून -- ) एवढं काही महत्त्वाचं नाही ते. उगीच किरकोळ गोष्टीला निष्कारण अती महत्त्व देताय तुम्ही !

विजयः म्हणजे कुठला मालधक्यावरचा बोलावलायस की स्टेशनवरचा ?

रवीः स्टेशनवरचा -- लाल डगलेवाला-- तो अशी कामं घेतो -- माणसं ॲरेंज करतो -- त्याला संध्याकाळीच वेळ असतो -- म्हणाले, घरी पाठवू का -- म्हटलं पाठवा.

विजयः तू मला सांगितलं असतंस तर एकदम मस्त माणसं एकदम चीप रेटमध्ये मिळवून दिली असती मी तुला.

रवीः बघू नं आता हा काय म्हणतोय ते --

संगीताः मुलांचं काही पत्रबित्र आलं की नाही ?

प्रभाः हो, मजेत आहेत मुलं ! तुमचं कसं काय ?

संगीताः अजून तरी आम्ही दोघं राजाराणी !

विजयः काय मोबाईल घेतलास का ?

रवीः नाही, अजून नाही घेतला.

विजयः बघ, आणायचा असला तर सांग. माझ्या ओळखीतनं घे -- चीप आणि बेस्ट ! खात्रीशीर ! आणि घेऊन घ्यायचा तर कॅसिओचाच घे ! बेस्ट एकदम ! परवा, ते आमच्या बिल्डिंगमधले कीर माहिती आहेत नं तुला, त्यांना कलर टीव्ही घेऊन दिला -- इतके खूष झाले ते ! ( संगीताला -- ) काय गं !

संगीताः ( त्या दोघी काहीतरी दुसरं बोलत असतात ) अं ?

विजयः नाही, कीर काय म्हणाले टीव्हीबद्दल ?

संगीताः इतके खूष झाले ते ! आणि याच्यामुळं पाचशे रुपये वाचले त्यांचे !

रवीः हल्ली सालं एक असा थकवा आल्यासारखं वाटतं मला ... थकून गेल्यासारखं वाटतं... शिवाय डोकं दुखतं मधूनमधून ...

विजयः मग दुर्लक्ष करू नको - डॉक्टर एम.पी. शहांच्याकडे चल माझ्याबरोबर. एकदम बेस्ट डॉक्टर आहे - आणि मुख्य म्हणजे पैशाचा लोभी नाही. आणि आयुर्वेदिक पाहिजे असलं तर वैद्य सुळे -- हिच्या एका मैत्रिणीचे सासरेच ते --

रवीः होमिओपॅथिक ट्राय करावं म्हणतोय.

विजयः मग फक्त दोन दिवस थांब -- आमच्या शेजारचे मोहिते होमिओपॅथिक ट्रीटमेंट घेतात -- त्यांना विचारून सांगतो मी तुला -- डोंट वरी --

रवीः चांगला खात्रीशीर पाहिजे पण डॉक्टर.

विजयः एकदम खात्रीशीरच देतो नं तुला --

प्रभाः कसला थकवा हो ! थकवाबिकवा काही नाही -- जरा मोकळ्या हवेत फिरून आलं की झालं -- करायचाय काय डॉक्टर त्याला --

संगीताः अगं, असं नाही - असं छोटं छोटं दुर्लक्ष केलं की तेच मोठं होऊन बसतं नंतर --

विजयः हे मात्र बरोबर बोललीस तू ! ( या संवादातली खोच फक्त विजय आणि संगीता यांच्यातच -- पण झाकून नेतात. )

रवीः आता मला वाचायची इतकी आवड आहे ना -- ( बोलतबोलत खिडकीपर्यंत जातो.) पण फारसं वाचवत सुध्दा नाही हल्ली -- ( खिडकीतून बाहेर पाहात उभा. )

प्रभाः कसलं ते वाचन तरी ! एकदा शास्त्राचं पुस्तक वाचायचं, एकदा इतिहासाचं, एकदा निसर्गोपचाराचं तर एकदा तत्त्वज्ञानाचं -- एकही धड होत नाही अशानं -- एवढं वाचायचं तर माणूस निदान विव्दान तरी झाला पाहिजे एखाद्या विषयात -- लोकांनी म्हटलं तरी पाहिजे -- हा विषय नं -- यांना भेटा -- हे काय नुसतं -- भाराभर चिंध्या नुसत्या --

संगीताः असंच काही नाही अगं --

विजयः सगळ्या विषयांचं थोडं थोडं वाचणंसुध्दा महत्त्वाचं आहे वहिनी -- असे तरी लोक किती असतात ? आणि सरकारी ऑफिसात नोकरी करणाऱ्या माणसाला विव्दान होऊन करायचंय काय ! ( रवी अजून खिडकीपाशी. ) काय, त्या हमालाची वाट पाहतोयस काय -- छोडो यार -- असे छप्पन्न हमाल आणून उभे करतो तुझ्यापुढे - स्टेशनवरचे म्हणालास तर स्टेशनवरचे - अगदी लाल डगलेवाले -- तू काय काळजी करतो - ( रवी येऊन जागेवर बसतो. )

रवीः तसं नाही --

प्रभाः आणि मला काहीच माहीत नाही अगं - बोललेसुध्दा नाहीत की असं असं एका हमालाला घरी बोलावलंय म्हणून ! जाऊं दे ते, चल, आत बसू - काय ते हमालाचं बोलत बसायचंय !

संगीताः अगं, तसं नाही - ( दोघी आत जातात.)

विजयः मी आता विचारतोच तुला - रवी, तोच हमाल कशाला पाहिजे तुला ? काय तुझं काही कमिशनबिमिशन आहे का काय त्यात -- सालं तसंही जमवून दिलं असतं आपण --

रवीः छट् रे ! अजून तरी मी एक करप्ट ऑफिसर म्हणून ओळखला जात नाही--

विजयः तसं तर सिध्द न झालेले सगळेच नॉनकरप्ट असतात रे ! ज्यांचं सिध्द होईल तेवढेच करप्ट असतात ! बरं ते जाऊं दे, पण काय विशेष एवढं ?

रवीः तसं काहीच नाही रे -- बोलावलंय नं त्याला --मग ते एक काम झालेलं बरं --

विजयः पण एक सांगू का तुला -- ऑफिसची ओझी वाहायची इतकी काळजी घेणारा मी तरी कुठे कुणी पाहिलेला नाही --थापा काय आम्ही मारत नाही ? अरे, चोराच्या वाटा चोराला ठाऊक नाहीत असं कसं होईल ?

रवीः बरं ठीक आहे -- माझं त्याच्याकडे दुसरं काहीतरी काम आहे असं समज तू --

विजयः धिस इज व्हेरी इंटरेस्टिंग -- एका सरकारी अधिकाऱ्याचं स्टेशनवरच्या एका हमालाकडे काम ! काय सांस्कृतिक देवाणघेवाणीचा प्रयोग वगैरे आहे का काय !

रवीः ( विचार करून, कानोसा घेऊन, जरा खालच्या आवाजात -- ) बरं बस इथं -- सांगूनच टाकतो तुला -- तू काही परका नाहीस आणि एकदम तमाशा होऊन भयानक काहीतरी घडल्यावर सगळ्यांना कळण्यापेक्षा एकदोघांना आधी थोडी कल्पना असलेलं चांगलंच एका दृष्टीनं --

विजयः ( बसत -- ) बोल !

रवीः आमच्या ऑफिसात एक प्यून आहे -- त्याच्या बोलण्यात एकदोनदा या हमालाचा विषय आला होता -- त्याचं काय आहे की हा हमाल जरी पेशानं हमाल असला तरी त्याच्याकडं खास अशी एक वेगळी अशी शक्ती आहे म्हणतात. माणसाच्या आयुष्यातले अगदी अशक्य वाटणारे प्रश्नसुध्दा तो सोडवून देतो अशी त्याची ख्याती आहे.

विजयः म्हणजे ?

रवीः म्हणजे असं की उदाहरणार्थ नोकरी नाही म्हणून समज वैतागलेल्या एखाद्या माणसाला आत्महत्या करावीशी वाटली -- तर तो हमाल या प्रश्नाची जबाबदारी घेतो आणि त्याचं आयुष्य नॉर्मल करून देतो -- असं --

विजयः म्हणजे काय कुठला देवबीव प्रसन्न आहे का काय त्याला ?

रवीः देवी कुठलीतरी प्रसन्न आहे म्हणतात --

विजयः पण तुला काय एवढा गंभीर प्रश्न पडलाय ? आणि असला तर मला नाही का बोलायचं ? आम्हीही काही प्रयत्न केला असता -- मित्र कशाला म्हणतात मग ! एकदम् ह्या हमालाला बोलावण्याएवढं काय झालं ?

रवीः आमच्या संसाराची झालीय बोंब ! आमचं एकमेकांशी अजिबात पटत नाही. उलट तिरस्कार आहे एकमेकांच्या मनात. आणि दोघांपैकी कुणीतरी वेडं तरी होईल किंवा असंच काहीतरी भयानक घडेल अशा टोकावर सगळं आलेलं आहे -- आणि यातून सुटायचे मला सुचणारे आणि दिसणारे सगळे मार्ग नाश करणारे आहेत -- म्हणजे मार्ग नाही --

विजयः कमाल आहे ! विश्वास नाही बसत ! मी उलट तुमचं उदाहरण दाखवत असतो संगीताला ! विश्वास नाही बसत !

रवीः पण असं आहे !

विजयः अच्छा !

रवीः आणि याच्यावर काहीतरी उपाय हा काढलाच पाहिजे आता --

विजयः अच्छा ! हे गंभीर आहे मग सालं ! पण तो हमाल कसले उपाय काढतो काही चौकशी केलीस का ?अघोरी असं काही नसतं ना !

रवीः ते आता मलाही माहिती नाही -- आता त्याच्याशी बोलूनच बघायचं -- पण बोलू नकोस हे कुठं -- अगदी संगीतालासुध्दा --

विजयः अरे काय वेडा का काय ! हे कसं बोलीन मी !

रवीः बरं, रोजची घरात बोंबाबोंब म्हणजे मुलांच्यावरही संस्कार वाईट होतात रे -- नुकसान होतंय त्यांचंसुध्दा सगळं --

विजयः नॅचरली --

रवीः म्हणून एक ठरवलं - म्हटलं हे एक ट्राय तर करून बघू - काहीतरी उपाय काढला नाही तर खलास होणार आहे सगळं -

विजय : आयला, गंभीरच आहे सगळं !

रवीः सांगतो काय तर ! एका मानसोपचारतज्ञाची बायको या हमालानं सुधारून दिली असं म्हणतात -

विजयः अच्छा ! म्हणजे आम्ही अगदी मोक्याच्या वेळी आलोय मग ! बरं, तो आल्यावर बोलणार कसं काय त्याच्याशी -- सगळ्यांसमोर - ? त्यापेक्षा तूच त्याच्याकडे जायला पाहिजे होतंस.

रवीः त्याला घर बघावं लागतं आणि माणसं बघावी लागतात. ही म्हणजे कामाची सुरुवातच असते त्याची ! तो आल्यावर एका बाजूला घेऊन बोलता येईल -- जमेल कसंतरी --

विजयः म्हणजे काय अंगारेधुपारे देतो का परस्पर करतो उपाय ?

रवीः तेच माहीत नाही ना ! बघू आता !

विजयः तरी पण एका तिऱ्हाईत माणसाला आपला खाजगी प्रश्न सांगायचा म्हणजे विचित्रच वाटतं जरा --

रवीः पण आता इलाज नाही ना -- आणि हा खात्रीशीर प्रश्न सोडवतो म्हणतात --

विजयः मलासुध्दा हे भयंकर इंटरेस्टिंग वाटायला लागलंय -- बघू, तुमचं जमलं तर आमचंही बघू मग --

रवीः आँ ? तुमचं काय ?हे बघ, माझं डोकं झालंय कमकुवत. कसला धक्काबिक्का देऊ नकोस -- तुमचं काय ?

विजयः		बघू -- नंतर सांगीन मी तुला -- तुमचं काय होतंय ते तर बघू --

रवी :		आमचं काहीही होवो -- मी तुला एक मित्र म्हणून विश्वासानं माझं दुःख सांगायचं आणि तू मात्र लपवून ठेवायचं हे बरोबर वाटतंय का तुला ?

विजयः		आमचा प्रश्न तर तुझ्याहून गंभीर आहे -- थोडक्यात म्हणजे आमच्या बिल्डिंगमधल्या एका माणसाबरोबरचं संगीताचं वागणं बरोबर वाटत नाही मला --

रवीः		माय गॉड ! मी नक्की सांगतो, तुझा हा काहीतरी गैरसमज असणार आहे. संगीतावहिनी ? नो, नो --

विजयः		आमचं लव्हमॅरेज आहे हे माहितीच आहे तुला -- तिच्या दृष्टिक्षेपांनी आणि खाणाखुणांनी घायाळ व्हायचो मी त्या वेळी -- पण आता लग्न झाल्यावर या हत्यारांचं काय काम ? तिला कुठंतरी तसं वागायची चटक वाटत असावी असं वाटतंय मला. बरं, बघितलं बघितलं आणि एकदा स्पष्ट म्हटलंच मी तिला की हे मला बरोबर वाटत नाही, तर ती काय म्हणाली ? म्हणे एखाद्या खुळ्या संशयी नवऱ्यासारखं वागू नकोस ! म्हणजे मी संशयी ! बरं, काहीही झालं तरी मी संशयी असंच होणार याच्यात ! मी दाखवून देत नाही, पण हा एक डोकं पोखरून काढणारा प्रॉब्लेम आहे साला !

रवीः		भयानक आहे !

विजयः:		बरं, असा विषय काढला नं की रडते रे ती ! पण वागण्यात फरक नाही ! रडणं खरं का हे खरं असं होतं मग !

रवीः		पण संगीतावहिनी -- म्हणजे --

विजयः		तसंच असतं ते -- ही बायकांची डोकी कशी चालतात ते त्यांचं त्यांना माहीत ! पण त्यातनं निर्माण होणारे प्रश्न असे - काही उपाय नसलेलेच असतात - एक तर फौजदारी गुन्हा करा - नाहीतर सहन करा - काहीही केलं तरी बरबादीच सगळी - शिवाय आता स्त्रीमुक्तीचे नारे आहेत -- पुढं काय होईल आणखी कोण जाणे ! रागाच्या भरात काही घडू नये म्हणजे झालं ! पण मला तर धोक्याचंच वाटतंय सगळं !

रवीः		म्हणजे बघ - माझं असं, तुझं तसं - म्हणजे सगळी कुटुंबं पोखरलेलीच असतात का काय आतून ? असं नसेल पण ! एकमेकांशी समजुतीनं, प्रेमानं वागून संसार करणारेसुध्दा असतील -- नाहीतर आपल्या वैतागण्याला काही अर्थच नाही मग !

विजयः		हे असं व्हायला नकोय खरं म्हणजे आयुष्याचं ! कुणाच्या तरी दुसऱ्याच्या वागण्यामुळं आपलं आयुष्य खरचटत राहण्याची ही पध्दत काही बरोबर नाही.

रवीः		ते झालं, पण शेवटी आहे या समाजात आणि आहे या परिस्थितीत काय करायचं हे समजलं पाहिजे --

विजयः		माझ्या एक लक्षात येतंय की, मी मुळात हिंसक नसताना एक वेडा हिंसक माणूस म्हणून शिक्का मारून घ्यावा लागणार आहे मला.

रवीः		कुणाला काय वाटेल हा विचारच सोडून द्यावा लागेल शेवटी. ( डोकं दाबून -- ) आऽह ! हल्ली हे मधनंमधनं डोकं दुखायचं एक चालू झालंय, अशी जरा वेळ कळ येते डोक्यात आणि मग कमी होतं. कधीकधी ताप येतो.

विजयः		मग औषध वगैरे ?

रवीः		घेतो गोळ्या घरीच -- जास्तच वाटलं तर डॉक्टर -- आऽह --

विजयः		पूर्वी असं काही नव्हतं तुला -

रवीः		मला वाटतं या रोजच्या मनस्तापानंच हे सुरू झालंय -- असं झालं नं की गप्प राहते ती. नॉर्मल झालं की पुन्हा हिचं अब्नॉर्मल सुरू ! मी म्हणतोसुध्दा की ही डोकेदुखी मला तुझ्या स्वभावामुळं लागली -- त्याच्यावरही वाद होतो --

विजयः		खरं म्हणजे सगळं चांगलं आहे तुमचं ! असं व्हायला नकोय !

रवीः		मग असं वाटतं कधीकधी की आपण मेलो तरी हिला पर्वा नाही-- मग त्यापेक्षा हीच मेली तरी बरंच होईल की ! आपणसुध्दा घराची जबाबदारी, मुलं वगैरे जास्त कशाला मानत बसायचं ? आपणही वाटेल तसं वागावं ! काहीही होऊं दे.

विजयः		मलापण असंच वाटतं -- मीसुध्दा बघणार नाही. आपणही दुसरी बाई बघावी -- शक्य तर घरात आणून हिच्या उरावर ठेवावी असं वाटतं -- पण असं झालं ना तर हिचा स्वभाव असा आहे की आत्महत्याच करेल ती. अशी परिस्थिती तयार झाली की ती वेडी तरी होईल नाहीतर आत्महत्या तरी करेल ! तर

| | |
|---|---|
| | असं का झालं हा एक विषय होणारच लोकांमधे -- म्हणजे नाश होऊनच्या होऊन पुढे आपलं मात्र लाजिरवाणं गुन्हेगारासारखं जिणं होणार -- |
| रवीः | यातली परत खास गोष्ट अशी आहे की आपल्या वागण्यामुळं आपल्या नवऱ्याचं काही बरं वाईट झालं तर काय हा विचारही त्यांच्या डोक्यात येत नाही -- कदाचित त्यांचं जे काय असतं ना ते आपोआप चालत असेल -- हे का ते अशी निवड त्यांना करावीच लागत नाही -- आणि आपण मात्र विचारपूर्वक ठरवून मार्ग पत्करतो असंच दिसतं ! त्यामुळं बायका कधीच गुन्हेगार होत नाहीत -- कारण विचाराचा वापर नसल्यानं जबाबदारीच नसते त्यांच्यावर ! मेंदूचा वापर करायची बाईची आणि पुरुषाची पध्दतच वेगवेगळी असेल बहुतेक -- |
| विजयः | माझे सगळे विचार शेवटी अशा टोकाला येतात की आपण सहन करण्यापेक्षा गुन्हेगार झालेलं परवडेल -- नाहीतरी कोण कुणाचं आयुष्य जपत बसणार ? आपण आपलं स्वतःचं सुध्दा आयुष्य जपू शकत नाही -- ( संगीता येते. ) |
| संगीताः | ( उत्साहानं -- ) आपण चौघांनी रात्री नऊच्या पिक्चरला जायचं ठरवतोय आम्ही - तुम्हा दोघांचा काय विचार ? |
| विजयः | जायला हरकत नव्हती म्हणा - पण -- याचं -- रवीचं डोकं दुखतंय -- |
| संगीताः | हो ? कशानं एकदम असं ? ( - जरा अतीच -- ) |
| रवीः | नाही - असं मधनंमधनं होतं मला - पण पिक्चरचं नका ठरवू -- |
| संगीताः | ठीक आहे - कॅन्सल ! सांगते मी प्रभाला -- ( जाते. ) |
| विजयः | गंमत पाहिलीस नं - म्हणजे या दोघींत असला विषय नसतो - म्हणजे यांचा एकमेकींवर विश्वास नाही असं म्हणायचं की त्या आपल्यापेक्षा सहनशील आहेत असं म्हणायचं की ढोंगी आहेत म्हणायचं ? |
| रवीः | तुम्ही इथं यायच्या आधी ही रडत होती - एक मिनिटात चेहरा बदलून आली ती - |
| विजयः | आपल्या घरच्या गोष्टी बाहेर कशाला कळू द्यायच्या असा उदात्त विचारही असेल - पण मला वाटतं - समजा उद्या स्फोटच झाला एकूण तर त्यांच्यावर दोष येऊ नये याचीही नकळत सोय आहे याच्यात - म्हणजे जणू काही यांना काही अपेक्षा नव्हतीच असं काही घडण्याची - फार सूक्ष्म डावपेच आपोआप घातलेले आहेत निसर्गानं यांच्या मेंदूंत - ( प्रभा आणि संगीता येतात. ) |
| प्रभाः | ( रवीला -- ) परत डोकं दुखायला लागलं ? |
| रवीः | हो. आणि कृपया तुला माझी काळजी असल्यासारखं बोलू नकोस. |
| प्रभाः | म्हणजे मला तुमची खोटी काळजी वाटते - |
| रवीः | वाद नको आणि कटकट नको ! बास ! |
| प्रभाः | ( रडत -- ) म्हणजे माझ्यामुळंच तुम्हाला त्रास होतो असं तुमचं म्हणणं - |
| रवीः | आत्ता तरी डोक्याला ताप नको ! बास ! ( प्रभा रडत डोळे पुसत आत जाते - मागोमाग संगीता जाते. ) या अशा प्रकारांमुळंच मला हा विकार जडलाय आणि अशाही परिस्थितीत तेच म्हणजे हलकटपणाला काही सीमाच नाही -- |
| विजयः | जाऊं दे ! सध्या लक्षच देऊ नकोस तू - |
| रवीः | अरे आगीत होरपळत असताना दुर्लक्ष कसं करता येईल ? |
| विजयः | माझी सुध्दा एक खात्री होत चाललीय -- ( दारावरची बेल वाजते - ) थांब, मी उघडतो - ( दार उघडतो. दारात हमाल - लक्ष्मणराव - उभा. सुमारे ३७. ) |
| लक्ष्मणरावः | रवीसाहेब कोण ? |
| विजयः | होय - या, या - इथंच - |
| रवीः | ( उठून ) या, या - बसा - |
| लक्ष्मणरावः | ( येऊन बसत - ) उंदरानं माशीचा पंख कुरतडावा आणि हमालाच्या डोक्यावर शेवटची काडी ठेवावी -- अशी सगळी मातेची लीला आहे. |
| रवीः | सॉरी -- काही कळलं नाही -- तुम्हाला निष्कारण त्रास तर नाही ना झाला ? नाराज नाही ना ? |
| लक्ष्मणरावः | या विश्वात निष्कारण काही नसतं - आणि कारणानं घडणाऱ्या सगळ्या गोष्टी खोट्या असतात -- हजार माणसं मेली काय आणि जगली काय - माता त्याची कारणं बघत बसत नाही -- कारणं माणूस बघतो आणि दुःख भोगतो -- |

रवीः मग दुःखाचं बोलायचं की नाही ? तुम्ही असं मुळातच कापून टाकलं तर -

लक्ष्मणराव : बोला - काय प्रश्न आहे ?-- नवराबायकोतलं असेल तर कठीण आहे - कारण स्त्री ही माता आहे --

रवीः म्हणजे बापाला काही महत्त्व नाही ?

विजयः तुम्ही खरंच हमाल आहात का ? तुमच्या बोलण्यावरून वाटत नाही --

लक्ष्मणरावः लक्ष्मणराव म्हणतात सगळे मला -- पण लक्ष्मणराव खोटा - तो एसएससी झालाय हे खोटं आणि तो हमाल आहे हेही खोटं - पण तसं दिसतं म्हणून व्यवहारात तेच खरं - बोजा उचलला तर हमाली घेतोच मी - एखादा माणूस पंतप्रधान असतो का नाही ? मग मी हमाल असलो तर काय चुकलं ? प्रत्येक गोष्टीचा स्वतंत्र अर्थ बघत बसलं तर चुकलं - प्रत्येक स्वतंत्र गोष्टीव्यतिरिक्त अर्थ कळला पाहिजे.

रवीः नवराबायकोतलंच आहे - दोघांनाही ते असह्य होत चाललंय - विशेषतः मला - मला तर डोकेदुखीचा विकारच जडलाय -

लक्ष्मणरावः कळलं ! नवराबायकोच्या वैतागाचे हजारो प्रकार असतात - कुणाचं कसं चुकतं आणि कोण दोषी आहे हे सांगायचं म्हटलं की तासंतास सांगत बसतात - शेकडो घटना आणि प्रसंग त्यांना पाठ असतात - पण मी त्याच्यात कधीच इंटरेस्ट घेत नाही - कुणाचं चुकतंय याला महत्त्व नाही -- क्षमाशीलपणा म्हणजे उज्ज्वल भविष्यासाठी एखाद्या मुंगीनं त्याग करायचा असं आहे हे -

रवीः पण कुणाचा दोष आहे हे कळल्याशिवाय न्यायाचा मार्ग कसा निघणार ?

लक्ष्मणरावः तुम्ही फार शिकले सवरलेले दिसता पण तुमचं कठीण आहे - माणसामाणसातल्या संबंधात न्याय शोधत बसता तुम्ही ? कुठेतरी सापडतो का न्याय तुम्हाला ? सगळ्यांना आपापलं बरोबरच वाटत असतं -- यात न्याय कसा असेल ? शिवाय एखादा माणूस नट - हीरो - जास्त महत्त्वाचा आणि आपण कमी महत्त्वाचे, एखादा अपंग आणि एखादा बेश्ट खेळाडू, तुम्ही ऑफिसर आणि मी हमाल -- कुठं आहे न्याय याच्यात ? कोर्टात गेलं तर एखाद्याला जास्त फीवाला चांगला वकील देता येतो आणि एखाद्याला कमी खर्चाच्या किरकोळ वकीलावर भागवावं लागतं -- यात कुठं आहे न्याय ? कधीही, कुठंही, कुणीतरी जिंकणं आणि कुणीतरी हरणं याच्यात न्याय असतो ? तुमच्या बायकोनं तुमची बायको व्हायचं आणि तुम्ही नवरा यात तरी कुठं आहे न्याय ?

रवी : पण उलटं कसं होणार ?

लक्ष्मणरावः निरनिराळ्या परिस्थिती असतात. त्या बदलतही असतात. पण कुठल्याही माणसाचे प्रश्न मिटून न्यायाची शांत अवस्था आली असं कधीच होत नाही. परिस्थिती बदलल्यावर प्रश्न मिटतात असं म्हणणाऱ्यांच्या शेंडया धरून मी विचारतो की वेड्यांनो सगळे मूळ प्रश्न हे माणसाच्या स्वभावाचे आहेत - माणसाचा स्वभाव, देशाचा स्वभाव - हेच खरे प्रश्न आहेत - म्हणून बाहेर कितीही फरक केले आणि कृती कोणतीही केली तरी प्रश्नांचे रंग फक्त बदलतात, आकार बदलतात पण दुःख आणि छळ तसेच राहतात - हे समजतं का तुम्हाला ? -- तुम्हाला म्हणजे मी ज्यांच्या शेंड्या धरल्या त्यांना - पण तुम्हालाही हे समजायला पाहिजेच -

विजयः मग काय करावं म्हणता ? हे असंच राहू द्यावं ? आणि जगाचं घेऊन काय करायचंय आपल्याला ?

लक्ष्मणरावः हं - मी विचारणारच होतो - हे कोण ? तिऱ्हाईत माणूस अशा वेळी नसावं --

रवीः माझा मित्रच आहे तो -- परका नाही --

लक्ष्मणरावः स्वतःचं आणि जगाचं यात फरक करायची तुमची पध्दत आहे तर तुम्हाला कुठला मार्ग सुचतो ?

रवीः तिनं तिचा स्वभाव बदलावा आणि घरातलं वातावरण समाधानी - प्रसन्न ठेवण्याची जबाबदारी घ्यावी--

लक्ष्मणरावः त्यांच्यावर अवलंबून राहणारा हा मार्ग काय उपयोगाचा आहे ?

रवीः मग मी आत्महत्या करणं --

लक्ष्मणरावः हां ! असं बोला !

रवीः किंवा तिचा खून करणं !

लक्ष्मणरावः बरोबर ! हे दोन मार्ग तुमच्या स्वतःच्या हातातले आहेत -- पण मी म्हणतो आत्महत्या का करायची आपण ? खूनच करावा -- खून करणं हाच आणि हा एकच उपाय ठीक आहे -- प्रश्नाच कारण असलेली व्यक्तीच खलास केल्यावर काय प्रश्न आहे ?

रवीः खून ?

विजयः खून ?

लक्ष्मणरावः हो ! माझं ऐका आणि खुनाचं पहा -- माणसामाणसांच्या संबंधात हाच एक खरा उपाय असतो -- नाहीतर मग खून न करता खुनाची शिक्षा भोगत बसा -- त्याच त्या प्रश्नात सडत राहणं म्हणजे शिक्षा नाही तर काय आहे ?

रवीः म्हणजे माझ्या बायकोनं तुम्हाला विचारलं तर काय सांगणार ?

लक्ष्मणरावः अर्थात तुमचा खून करायला सांगणार. एखाद्या माणसाला वेडं करणं किंवा आजारी पाडून मारणं हे खून नाही तर काय आहे ? असला सगळा चिवडा करत बसण्यापेक्षा झटकन खूनच करावा --

रवीः म्हणजे हिनं माझ्या हातनं मरायचं - मी तुरुंगात जायचं - आणि पोरांनी भिकेला लागायचं - असा एकच सुखाचा मार्ग आहे हा !

लक्ष्मणरावः मग नाहीतरी आता काय चाललंय असं वाटतं तुम्हाला ?

रवीः मग दोन्ही सारखंच आहे तर नवीन उद्योग करायचाच कशाला ? हा ताप बंद करून नवा सुरू करून घ्यायचा - त्यापेक्षा आहे तसं चालू द्यावं --

लक्ष्मणरावः मर्जी तुमची !

विजयः चांगला आहे धंदा तुमचा - फी किती तुमची ?

लक्ष्मणरावः सल्ला ऐकला आणि त्याप्रमाणे वागलं तरच फी घेतो मी --

रवीः आणि मग स्त्री म्हणजे माता असते हे कुठं गेलं सगळं ?

लक्ष्मणरावः अहो, स्त्रीचं रूप म्हणजे मातेचं रूप -- पण खून होऊन मरायची लायकी असलेल्या बाईला माता कोण म्हणेल ? कोण म्हणेल ?

विजयः हुषार आहात ! उठा आता - आणि चटकन बाहेर व्हा - जोडे खाल नाहीतर--

रवीः अरे --

लक्ष्मणरावः मी तर जातोच - माझं काम झालेलंच आहे - एकतर आता तुमच्यावर कोर्टात खटला चालेल तिथं येईन - किंवा मेंटल हॉस्पिटलमध्ये दाखल झालात तर तिथं भेटायला येईन - पण वेडे झालात तर भेटून तरी काय कळणार तुम्हाला ? तुम्ही माझा सल्ला ऐकाल ही खात्री आहे मला - मग मात्र फी द्यावी लागेल - तेसुध्दा फी द्यायला तुम्ही ठिकाणावर असलात तर - तसं हमालीवर आपलं मस्त चालतं -- असल्या फालतू हमालीची मला गरज नाही -- ( जायला निघतो. प्रभा आणि संगीता येतात.) असला एक बुध्दिवादी मित्र असावाच माणसाला -- कुठल्याही प्रश्नाला तोंड देऊ शकतात असले लोक --

प्रभाः संपलं की नाही तुमचं ? चहा झालाय - आणू का ? ( लक्ष्मणरावला -- ) आवाज ऐकला म्हणून तुमचाही केलाय --

लक्ष्मणरावः हे बघा बाई - एखाद दिवशी एकच कप एक स्पेशल चहा करा आणि नवऱ्याला पाजा तुमच्या --
( जाताना थबकून रवीला --) कशावरही कुठलाही मार्ग नसतो. मूर्खांनो - अजून विचार करा ! -- मार्ग विचारतायत गधडे ! ( जातो. )

संगीताः हे काय बाई ! इतकं असं का निघून गेले ते ?

प्रभाः कुठली कोण माणसं बोलावतात घरी - आणि हे ऐकून घेतायत !

संगीताः जाऊं दे ते - आपला नको मूड खराब करायला - आण चहा --

प्रभाः आणि नंतर जेवून सावकाश जायचं हं --

संगीताः हो ग बाई ! जेवूनच जाऊ !

विजयः अगं कशाला ?

संगीताः ती ऐकत नाही --
( अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा रात्र. समोर रवी सिगरेट पीत बसलेला. हातात पुस्तक. विमनस्क. काही क्षणांनी प्रभा येते. तिच्या चेहऱ्यावर चीड. )

प्रभाः तुम्हाला नाही तरी वाचत बसायला आवडतंच -- माझी मात्र सगळी झोपेची नासाडी झाली ! --

रवीः कुणी केली नासाडी ?

प्रभाः याचं उत्तर द्यायला हवंय ? मारणारा विसरून जातो पण लागतं त्याला जखम होत असते --

रवीः जखम ?

प्रभाः चारचौघांत अपमान केलेलं मला आवडत नाही -- हज्जारदा सांगितलंय --

रवीः आता झाली ना ती चर्चा इतका वेळ --

प्रभाः चर्चा नाही -- वादावादी म्हणतात त्याला --

रवीः मी काही फार चुकीचं बोललो असं मला वाटत नाही -- हे राहिलं, ते विसरलं हे तुझं नेहमीचंच असतं ! कधीतरी घडणारी गोष्ट असली तर एवढं काही वैतागत नाही माणूस !

प्रभाः पण चारचौघांत हे बोलायची गरज काय ? स्वयंपाकातल्या पदार्थांना काहीतरी घालायला विसरणं, केलेला पदार्थ वाढायला विसरणं -- हे हिचं नेहमीचंच आहे -- हे कशाला बोलायला हवं होतं ?

रवीः साठलेला वैताग असतो हा ! एकदा तर च्यायला ॲडव्हान्स बुकिंग करून आणलेली पिक्चरची तिकिटंच हरवलीस तू ! आणि हे सांगितलंस कधी ?-- थिएटरवर -- ' हाऊसफुल्ल ' बोर्डाजवळ आपण उभे असताना --

प्रभाः माझ्याकडे दिलीतच कशाला तिकिटं ती ? तुम्हाला सांभाळता येत नव्हती ? आणि रुमाल इतके हरवायची सवय कुणाला आहे ? जिने चढताउतरताना ठेचकाळतं कोण ? नुसत्या दुसऱ्याच्या चुका काढायच्या !

रवीः एखादवेळेस काही घडणं आणि नेहमीच काही घडणं यात फरक असतो.

प्रभाः स्वतःच्या अपेक्षेसारखं दुसरं माणूस नाही वागलं की डोकं फिरतं, मग आपण वागतो का दुसऱ्याच्या अपेक्षेप्रमाणं -- हे कधी बघणार ? आमची कुणी माणसं आली की कपाळावर आठ्या पडतात तुमच्या !-- ते काही जेवण बाहेर पाडायला येत नाहीत तुमच्याकडे । प्रेमानं भेटायला येतात ! तुम्हीच तुसडे, माणूसघाणे आहात !

रवीः त्याचा काय संबंध इथे ?

प्रभाः मीच असं नाही -- कुठलीही स्त्री -- आनंदात, समाधानात राहू शकलेली नाही तुमच्या घराण्यात -- सगळ्या एकलकोंड्या आणि क्रूर लोकांचं घराणं आहे तुमचं !

रवीः या सगळ्याचं मूळ कशात आहे ते बघ नं -- तुझ्या सततच्या त्रासिकपणानं वैतागलेला असतो मी ! -- तुझ्यामुळंच मी वैतागलेलं राह्यचं आणि तुझ्याशी आणि तुझ्या माणसांशी आनंदानं वागायचं हे कसं शक्य आहे ?

प्रभाः त्यापेक्षा तुम्ही आनंदानं वागायला लागल्यावर आपोआप माझा त्रासिकपणा कमी होईल हे कसं लक्षात येत नाही ?। --

रवीः जाऊं दे, मरूं दे ! मी एक वाईट, फालतू माणूस आहे ! मी असाच राहणार आणि असाच वागणार ! काय करायचं ते कर, जा !

प्रभाः ( रडत --) हेच -- हेच म्हणणार तुम्ही -- काय करणाराय मी ? मुलं आहेत ना पदरात --

रवीः आता यावेळी तरी बास -- एक वाजतोय रात्रीचा -- तोच धंदा नको सतत --
( दारावरची बेल वाजते. प्रभा आत जाते. रवी सावकाश उठतो. सावकाश चालत दारापर्यंत जातो. क्षणभरानं --) कोण आहे ? ....कोण आहे ?

विजयः ( बाहेरून -- ) मी विजय आहे, रवी, दार उघड -( रवी दार उघडतो. विजय आणि संगीता येतात. विजय पूर्ण विस्कटलेला. संगीता रडून विदीर्ण झालेली. आत आल्यावर विजय दार लावतो. ते दोघे पुढे येऊन बसतात. संगीता एका कडेला उभी राहून हुंदके देत राहते. काही क्षण कुणीच काही बोलत नाही. रवी गोंधळलेला. काही क्षणांनी-- )

रवीः आत्ता ? या वेळी ? काय झालं ? -- रात्रीचा एक वाजलाय --

विजयः ती आता खूप रडून दाखवेल --पण शेवटी मुद्द्यावर यावंच लागेल तिला --

रवीः काय झालं काय पण ? ( संगीताला -- ) काय झालं काय वहिनी ? रडतेस का ?

संगीताः ( रडतच -- ) त्यालाच विचारा ...भूत शिरलंय त्याच्या डोक्यात....

विजयः ( चिडून --) अजूनही माझ्या डोक्यात भूत शिरलंय असंच तुझं म्हणणं ? मी डोळ्यांनी बघितलेलं खोटं ! काय वेड लागलंय का मला ?

संगीताः ...होय...वेडच लागलंय...मला कुणीही असं वागणारी म्हणत नाहीत ... हा एकटाच म्हणतो... मी अशी असते तर शेजारपाजारच्या बायकांनी -- दुसऱ्या कुटुंबांनी संबंध ठेवले असते का माझ्याशी ?

विजयः त्यांना ते अजून समजलेलं नाही एवढंच. घडलेला प्रसंग कसा घडला ते सांग. ( झोपेतून उठून आल्याप्रमाणे प्रभा येते. )

प्रभाः तुम्ही पुन्हा ? या वेळी ? म्हटलं बोलण्याचे आवाज कुणाचे येतायत ?( रवी प्रभाकडे पाहतो.)

विजयः हेच -- तुमच्या मैत्रिणीचे उद्योग - विचारा तिला - काय कमी पडतंय तिला घरी ? का म्हणून मी असले अपमान सहन करायचे ? घरी हिनं कबूल केलं आणि रडली पुष्कळ - आणि आता तुमच्यापुढं वेगळं बोलतेय --

संगीताः तुझ्या संतापाला घाबरून कबूल केलं मी -- पण खरं नाही ते -- मला काय कमी आहे ? तुझ्यावर मनापासून प्रेम आहे माझं -- हा संसार मोडावा असं कशाला वाटेल मला ?

विजयः ते सगळं ठीक आहे पण तुझं चुकतंय की नाही हा प्रश्न आहे. आणि कोणत्या प्रकारच्या दृश्यात तुला पकडलं म्हणजे तू चूक कबूल करशील तेही सांगून टाक. आणि मला एकट्याला तसं दिसलं तरी चालेल का चारचौघांना दाखवायला पाहिजे तेही सांग. कारण मी ' वेडा ' आणि ' संशयी 'आहे. नाहीतरी लाज, मान- अपमान काही राहिलेलंच नाही -- तेही करीन --

प्रभाः अहो, काय चाललंय हे ? किती घाणेरडं बोलताय तिच्याशी ! --

विजयः ती किती घाणेरडं वागतेय माझ्याशी ते विचारा तिला. मी माझ्या डोळ्यांनी पाहिलं -- हिनं कबूल केलं -- रडली -- आणि आता पुन्हा मला खोटं पाडतेय --

संगीताः मला वेडी करायचीय का तुला ?

विजयः नाही - तू वेडी होऊ नयेस म्हणून निमूटपणानं हे तुझं वागणं सहन करत बसतो -- मला अपमानास्पद तू वागली नाहीत तर तू वेडी होण्याचा प्रश्न कशाला येईल ? मुळात बदल कुठं व्हायला पाहिजे ?

संगीताः ( प्रभाला -- ) खरंच, कधीही याचा विश्वासघात करावा असं माझ्या मनातसुध्दा येत नाही --

विजयः तुझ्या मनात काय येतं आणि काय येत नाही ते तुझं तुला माहीत -- प्रश्न प्रत्यक्ष घडतंय काय हा आहे.

प्रभाः अगं, काय हे वेड्यासारखं ? चांगले आलात, जेवलात, गप्पा मारल्या आपण आणि हे काय अचानक ?

विजयः अचानक नाहीय ते -- बरेच दिवस धुमसतंय -- आणि असल्या गोष्टींचा कधीतरी स्फोट होतोच -- आणि समजा हे फक्त नवऱ्याच्याच लक्षात आलं तर आणखी पुढचा हलकटपणा करून त्याला ' संशयी ' म्हणून वेडा ठरवत राह्यचं !

रवीः अरे पण काय झालं काय ते सांगाल की नाही ? काय झालं हे आम्हाला कळलं तर काही समजुतीचा मार्ग निघतो का ते तरी बघता येईल.

विजयः समजुतीचा मार्ग यातून निघणं शक्य नाही. आपण कसं वागतोय हे काय हिला समजत नाही ? जाणून बुजून चाललंय सगळं -- याच्यात समजुतीचं म्हणजे काय अमुक एका मर्यादेपर्यंत अपमान सहन करावा असं म्हणता येईल ? याच्यात असं आहे की सुरुवात मान्य केली की शेवट मान्य केल्यासारखंच आहे -- एकदा डोक्याचं भान सोडून वागायला लागल्यावर शेवटची घटना कधीही घडू शकेल.

प्रभाः संगीता, यांना एवढं चिडायला काय झालं ते तू सांग. काय झालं एवढं ?

विजयः ती सांगू शकणार नाही आणि सांगितलं तर खोटं सांगेल --

संगीताः ( रडतच --) त्यालाच सांगू दे --

विजयः मी सांगतो. मला आता लाज धरून चालणारच नाही -- ( रवीला -) आम्ही सुमारे अकरा वाजता घरी गेलो. ही ज्याच्याशी चोरटे चाळे करते म्हणून मी तुला सांगितलं तो जणू आमची वाटच पाहात होता. तो कॉरिडॉरमधे आला, ' काय फिरायला गेला होता वाटतं ? ' असं मला नाही -- हिला म्हणाला. ती बोलत राहिली. मी पुढे होऊन दार उघडलं - आत गेलो. काही क्षणांनी, ही अजून कशी आली नाही म्हणून मी दारातून बाहेर पाहिलं तर तो हिच्या हाताचं चुंबन घेत असलेलं मला दिसलं. ही झटकन घरात आली. चेहरा चोरटा झालेला होता. त्या प्रसंगाचं भान अजून चेहऱ्यावर होतं -- हे घडलंय की नाही विचारा तिला.

संगीताः ( ओक्साबोक्सी रडत --) - होय - घडलंय हे - खरं आहे हे सगळं - ( रडत राहते. शांतता...)

विजयः आणि आपली बायकोच वागायला अशी आहे म्हटल्यानंतर दुसऱ्याला काय बोलणार आपण ? तो म्हणेल तुम्ही तुमची बायको सांभाळू शकत नाही हा तुमचा दोष आहे - तुम्हीच कमकुवत आहात त्याला कोण काय करणार ?-काय बोलणार मग याच्यावर ?पण स्पष्टच बोलायचं झालं तर हिच्यासारख्या तीन बायका मी पूर्ण समाधानी ठेवू शकतो -- माझ्यात काही कमी नसताना मी का असले अपमान सहन करायचे ?

रवीः विजय, तू अतिशय चिडलेला आहेस - शांत राहा जरा - परदेशात काय -- हाताची काय, गालाचीसुध्दा चुंबनं घेतात आणि त्यांना काही वाटतही नाही त्याचं - पण आपल्या समजात- इथल्या परिस्थितीत

वाईटच आहे हे - मी म्हणतो चूक कबूल करणं ही सुधारण्याची पहिली पायरी आहे -- मी काय म्हणतो संगीतावहिनी, ही चूक पुन्हा होणार नाही याची खबरदारी घेशील नं तू यापुढे ?

संगीताः ( रडतच -- ) विजयमध्ये काही कमी नाही - माझं खूप प्रेमही आहे त्याच्यावर - मला त्याच्याशीच संसार करायचाय - पण माझ्या स्वभावातच दोष आहे-- तसं वागलं जातंच माझ्याकडून -- मला कळतंसुध्दा की संसार करायचा असला तर हे धोक्याचं आहे - त्यामुळं चोरटेपणा येतो माझ्यात - पण तसं वागलं जातंच माझ्याकडून - विजयचा अपमान व्हावा म्हणून मुद्दाम मी तसं वागत नाही - माझ्या स्वभावातच दोष आहे - तसं वागलं जातंच माझ्याकडून --

विजयः कुठला नवरा हे चालवून घेईल ? हिच्या स्वभावात दोष आहे म्हणून मी आयुष्यभर बुळचट म्हणवून घेत बसू का ? बरं, कडक बंधनांमुळं समजा हिला हे चाळे बंद करावे लागले तरी या दडपणामुळं दुसरी काहीतरी विकृती येईल हिच्यात -- म्हणजे नवराबायको असे नॉर्मल संबंध राहूच शकणार नाहीत आमच्यात -- आणि हे सहन करत बसून माझ्या मनाची काही विकृती झाली तर कोण जबाबदार ?

संगीताः मला जरा समजून घे नं तू -- मी प्रयत्न करीन -- हळूहळू सुधारणा होईल --

विजयः हळूहळू सुधारणा होण्याचा हा विषय नाही - हळूहळू वाढतच जाण्याचा विषय आहे -

प्रभाः हे पहा, आत्ताच्या आत्ता सगळा विचार करायची काही गरज आहे का ? मी पण तिला समजावून पाहते--

विजयः काही उपयोग होणार नाही - आता जरी ती म्हणाली की यापुढं मी तसं वागणार नाही तरी मी त्याच्यावर विश्वास ठेवू शकत नाही--

रवीः बरं मग म्हणणं काय तुझं ?

विजयः माझं म्हणणं हा संसार होऊ शकणार नाही - घटस्फोट घेणं हा एकच मार्ग याच्यावर आहे -- ( संगीता हुंदके देऊन रडू लागते.)

प्रभाः काय हे वेड्यासारखं ? तिला तीन महिने झालेत --मघाशीच सांगितलं तिनं मला --

विजयः त्याला काय करणार ? आणि ती म्हणते तिचं फार प्रेम आहे माझ्यावर. तर एक करता येईल - घटस्फोट घ्यायचा -- मी दुसरं लग्न करीन -- आणि हिला नुसती राहू दे माझ्याकडे -- पण माझी बायको म्हणून नको -- ( संगीता रडता रडता घेरी येऊन पडते. प्रभा तिला सावरते. रवी, विजय निमूटपणे उभे. प्रभा तिला हळूहळू आत घेऊन जाते. काही क्षण शांतता... रवी विजयला बसवतो. स्वतः बसतो. सिगरेटचं पाकीट, लायटर काढतो. एक सिगरेट विजयला देतो -- )

रवीः घे --

विजयः नको --

रवीः घे रे ! ( विजय घेतो. रवी स्वतः एक सिगरेट घेतो. लायटरने दोघांच्याही सिगरेट शिलगावतो. लायटर ठेवतो. दोघेही काही क्षण शांत. मधेच एखादा झुरका -- ) तू हे फटाफट बोलतोस खरं पण हे आघात तिला सहन नाही झाले तर प्रॉब्लेम होऊन बसेल --

विजयः जाऊं दे. मरूं दे तिच्यायला -- हे चाळेपण करणार -- कमकुवत पण राहणार - आपल्या वागण्याचे परिणाम यांना सहनही होणार नाहीत - कोण काय करणार याला ? उलट ही स्वतः तर खलास होणारच आहे पण जाताजाता निष्कारण माझीही पडझड करून जाणार आहे - माझा काहीही दोष नसताना -- माझा दोष एकच म्हणजे मला तिची जी भुरळ पडली ती लग्न करण्यापर्यंत गेली -- मी नुसतं जमेल तेवढं हाताळून सोडून दिलं असतं तरी चाललं असतं -- प्रेमच समजलो मी ते सगळं -- आणि आता तर प्रेम म्हणजे काय हे सांगताही येणार नाही मला --

रवीः पुरुषाचा स्त्रीवर मालकी हक्क समजणारा आपला समाज आहे-- म्हणून हे प्रश्न फार तीव्र होतात--

विजयः मग स्त्रीमुक्ती करावी - लग्नाचं बंधनही ठेवू नये - लग्न करून हे अपमान का सहन करायचे ? लग्न करायची पध्दत आहे तोपर्यंत हा अपमानच समजला जाणार -

रवीः पण लग्न करून पुरुष असं वागला तर चालतं - हेही आहे.

विजयः त्याला मी काय करणार ? सध्या हा माझा अपमान आहे की नाही ? तो मी का सहन करायचा ? " बरोबर आहे. मी असं वागलो तर या समाजात चालतं ना - म्हणून मी माझ्या बायकोला पण असं वागायची परवानगी देतो "-- असं जर मी म्हटलं तर हसतील सगळे -- एक टवाळीचा विषय होऊन जगावं लागेल मला - आणि एक पायाचा दगड होणारा समाजसुधारक मला व्हायचं नाही -- ते माझं

ध्येय नाही -- आणि ती माझी ताकदही नाही --

रवीः म्हणजे सध्या तरी नाश हाच मार्ग आहे --

विजयः त्याला संगीतासारख्या प्रेमळ असणाऱ्या हजारो स्त्रियांनी एकत्र यायला पाहिजे आणि आम्ही लग्न न करता आणि बंधनं न मानता कुठेही राहू, कसंही वागू असं जाहीर सांगून तरुणांना आवाहन केलं पाहिजे --पुष्कळ लोक या योजनेला निरनिराळ्या कारणांनी तयार होतील -- पुष्कळजणी मातीत जातील -- त्याची तयारी ठेवावी -- आणि हे सगळं करतानासुध्दा एक लक्षात ठेवावं की रखेलीनंही जर निष्ठा सोडली तर तिचाही या समाजात खून होतो -- आणि ते काहीही असलं तरी रखेलीबरोबर राहणारा माणूस म्हणून मला जगायचं नाही - मला लग्नाच्या बायकोबरोबर संसार करायचा आहे -- त्यामुळं ही बाई माझ्या आयुष्यात मला नको आहे --

रवीः एक त्रयस्थ म्हणून आम्ही हे मिटवायचा प्रयत्न केला पाहिजे - पण -- ( प्रभा येते. दोघंही तिच्याकडे पाहतात.)

प्रभाः तिला शांतपणे पडून राहायला सांगितलंय मी -- भ्रमिष्टासारखी झालीय ती -

विजयः याच्यात हलकटपणा असा आहे की अजूनही माझ्या गळ्यात पडायचं सोडत नाही ती - जा नं बोंबलत तुला कुठं जायचं ते -- मला कशाला धरून ठेवते ?

प्रभाः तुम्ही सुध्दा संतापू नका -- काहीतरी वेडंवाकडं होऊन बसलं म्हणजे ?

विजयः वेडंवाकडं होऊ नये ही काळजी मी घ्यायची ! ! तिचं माझ्यावर प्रेमही आहे आणि तिच्याकडून असं वागलं जातंच आणि जाणारच - या तिच्या दोन खऱ्या गोष्टी सांभाळण्यासाठी मी बळीचा बकरा व्हायचं ? !

प्रभाः बघू नं आपण - तिला नीट वागता येईल असा आत्मविश्वास तयार करू आपण तिच्यात - सुधारेल ती -

विजयः तिला आत्मविश्वास येईपर्यंत माझा आत्मविश्वास खलास होईल ना पण ! !

रवीः हा संगीतावहिनीचा प्रश्न वेगळा आहे -- पण हळूहळू सुधारणारं मी तरी कुणी पाहिलेलं नाही -- हळूहळू जास्त जास्त बिघडवणारेच जास्त !। आपल्या मनाच्या ज्या काय हालचाली चालल्यायत -- त्यांना धरून आपण वागतोय नं म्हणजे आपण खरं वागतोय असं समजणारे प्रामाणिकच जास्त ! मग तसल्या प्रामाणिकपणाचे परिणाम काहीही होवोत !

प्रभाः हे पहा, ही गंभीर परिस्थिती आहे - याच्यात आपलं काही काढू नका -

रवीः का ? तू तरी काय मोठी आदर्श आहेस ते माहिती आहे - आपल्या स्वभावानं घरातल्या लोकांची बरबादी झालेली तुलाही चालते ! ! काय फरक आहे ?

प्रभाः आत्ता मला तिला सावरलं पाहिजे -- तुमच्या शहाणपणाची ही वेळ नाही -- मनात आलं की बोलून टाकायचं - वेळ बघायची नाही, प्रसंग बघायचा नाही ! दुसऱ्यांचासुध्दा विचार ठेवत चला जरा ! आत्ता तिला सावरणं महत्त्वाचं आहे --

विजयः सावरून काय करणार ?

प्रभाः अहो, आपण असं म्हणू की ही एक मनाची विकृती आहे - मानसोपचारतज्ञ असतात - ते बरंही करू शकतात -

विजयः ती येईल असल्या उपचारासाठी ?

प्रभाः प्रयत्न तरी केला पाहिजे ना ! !

रवीः सारखी बोंबाबोंब करणं, प्रत्येक गोष्टीचा त्रास करून घेणं, आपल्यावर सारखा अन्याय होतो आहे अशा भावनेनं वागणं ही तुझीही विकृती आहे - तुझ्यावर करायचे उपचार ?

प्रभाः हे सगळं तुमच्या स्वभावामुळं झालंय -- माझा आपणहून मुळात असा स्वभाव नव्हता - सारखं विकृत विकृत म्हटल्यावर कोण नीट राहील ?

रवीः संगीतावहिनीच्या स्वभावाचीसुध्दा काहीतरी कारणं असतीलच की - समजा आनुवंशिक असतील - मग झालं ? कारणं समजली म्हणजे मिटला प्रश्न ?

प्रभाः कशाचाही काहीही परिणाम न होता कुणालाच वागता येत नाही - ( वैतागून, त्राग्यानं ) पण हा वाद आत्ताच व्हायला पाहिजे का ? सध्या यांच्याकडे लक्ष दिलं पाहिजे -- थोडीशी माणुसकी असली तर उपयोगात आणा जरा --

रवीः हीच बुध्दिमत्ता एरवीसुध्दा वापरत जा म्हणजे झालं !!

विजयः मला असं वाटतं की पहिली स्टेप म्हणजे हिला तिच्या माहेरी पाठवून द्यावं -- मला आता तिच्याबरोबर एक दिवसही राहायची इच्छा नाही - माझं आयुष्य नीट जगायचा प्रयत्न मला केलाच पाहिजे - या निष्कारणच बसलेल्या धक्क्यातून मला सावरता येईल - तिनं माझ्या टाळक्यावर दगड मारत राह्यचं आणि वर मीच तिला समजून घ्यावं - आणि दयेनं वागावं - हा धंदा आपल्याला जमणार नाही - एवढ्या मोठ्या मनाचा मी नाही आणि एवढ्या मोठया मनाचा मला व्हायचंही नाही, आणि होताच येणार नाही --

प्रभाः ठीक आहे - मी समजावीन तिला - कदाचित माहेरी राहिल्यावर तिला स्थिरपणाही येईल -

विजयः तसली काही मी आशा धरत नाही - मला प्रयोग करायचेच नाहीत - तिला माहेरी अशासाठी पाठवायचं की समजा तिला आत्महत्या करावीशी वाटली तर ती इथं नको - तिकडं करू दे - आणि मुख्य म्हणजे माझ्या हातूनही काही बरंवाईट व्हायला नको -

रवीः ती घटस्फोटाला तयार होईलसं वाटत नाही -

विजयः माझ्यावर तिचं प्रेम आहे ना ? मग तिचा मला त्रास होऊ नये अशा प्रेमापोटीच घटस्फोटाचं बघायचं ! ! तिनंसुध्दा आत्महत्या करण्यापेक्षा किंवा माझ्या हातनं मरण्यापेक्षा घटस्फोट घेऊन जिवंत राहणं चांगलं नाही का ? त्यातल्यात्यात माणुसकीचा मार्ग हाच आहे -

रवीः एकूण लक्षणं पाहिली तर मला वाटतं की यातलं काहीच होणार नाही - ती वेडी होईल !!

विजयः होऊं दे !! तिचा बाप बघून घेईल !! मला ताप नको !!

रवीः एकमेकांवर जिवापाड प्रेम करणारे तुम्ही. आणि काय घडून बसतंय !! डोकं काम करायचं थांबतं सालं !

विजयः हो -- ते प्रेम टिकवायची दोघांचीही जबाबदारी होती - तिचं पाऊल चुकलं की माझं डोकं फिरणारच - कुणी कसंही वागलं तरी आपलं प्रेम आहेच - असलं कुठं प्रेम असतं का ? दोघांनीही एकमेकांना दुःख द्यायचं नाही आणि सुख द्यायचं या दोन अटींशिवाय कसलं आलंय प्रेम ? पण प्रत्यक्ष प्रेम करताना या अटींचं भान नसतं इतकंच -- तसं प्रेमविवाह आणि ठरवलेला विवाह यांच्यांत काही फरक नाही - अटी या सगळीकडं त्याच असतात - आणि हे कुणालाही मान्य होईल -- मी काही वेगळं म्हणत नाहीय -

रवीः तुझ्या या बॉंबस्फोटापुढं आमचा प्रॉब्लेम किरकोळ दिसतोय -- पण तसं नाहीय ते -- आमचंही तितकंच गंभीर आहे --

प्रभाः ते असूं दे - मी म्हणते, आता झोपू या सगळे - आणि सकाळी ठरवू काय करायचं ते - कदाचित् संताप कमी झाला तर काही वेगळे विचार सुचतील -- आत्ताचे भावनेच्या भरातले विचार काही शेवटचे धरायला नको --

रवीः सगळं पुढं ढकलायच्या आणि टाळाटाळ करायच्या हुशारीत काही तू कमी पडायची नाहीस --

विजयः खरं म्हणजे आमचा हा असला प्रश्न आम्ही तुमच्या घरात आणणंच तसं चुकीचं आहे - पण जवळिकीची, विश्वासाची माणसंच अशा वेळी आधारही वाटतात --

प्रभाः एकमेकांच्या दुःखातही सहभागी झालं नाही तर आपली माणसं म्हणायचं कशाला मग ? माणुसकी ती काय राहिली मग ?

रवीः असलं काही घडलं ना की आपण जे जे बोलतो ते ते सगळं खोटं आहे हे लगेच लक्षात येत राहतं -आणि खोट्याशिवाय आपल्याला काही बोलताच येणार नाही असं वाटतं - ( संगीता येते. हातपाय ढिले. भ्रमिष्ट अवस्था. )

प्रभाः ( तिला पाहून घाईनं -) अग, मी तुला झोपून राह्यला सांगितलं होतं ना ? कशाला आलीस बाहेर ? चल बघू --

संगीताः मला बोलायचंय - मलासुध्दा बोलायचंय - मी सुध्दा बोलणाराय -

विजयः उगीच नखरे करू नको - जाऊन झोप जा !!

संगीताः मला झोप नाही आली-- मी कशाला झोपू ? ( हसायला लागते - ) मी कशाला झोपू ? - ( पुन्हा हसते - हे चित्र पाहून विजय जरा दबकतो. तिच्या जवळ जातो.)

विजयः संगीता - तुझं प्रेम आहे नं माझ्यावर ? मग मला त्रास नाही ना देणार तू ? चल ।। आत जाऊ आपण - अं ?--( संगीता हसते -) संगीता,प्लीज, असं नको ना करूस -

संगीताः हं --

विजयः चल -- ( तो तिला हळूहळू आत घेऊन जातो. काही क्षण शांतता. )

प्रभाः ( रवीला -- ) मला तर अशी भीती वाटतीय की काहीतरी भयानक प्रसंग घडेल इथं - सगळा तमाशा

होईल -- हे वाढू नये याचा फक्त प्रयत्न करायला पाहिजे --

रवीः या निमित्तानं माझ्याशी एकोपा दाखवायचा प्रयत्न करू नकोस - चल् फुट !!

प्रभा : च्यल् फ्यूट !! ( फणकारून जाऊ लागते. तेवढ्यात आतून संगीता बाहेर आलेली तिला दिसते. मागोमाग विजयही येऊन उभा. प्रक्षुब्ध पण चिंतातुर आणि स्तब्ध .)

संगीता : ( म्हटलं तर प्रभाला उद्देशून पण जरा विचित्रपणे -- ) ए, आपण चहा घ्यायचा ? ( सगळे चकित. एकमेकांकडे पाहतात. विचित्र शांतता... हळूहळू पडदा पडत जातो....)

**-- अंक पहिला समाप्त ---**

## अंक दुसरा

( प्रकाश पडतो तेव्हा दृश्य तेच. प्रभा आणि संगीता दोघीच आहेत. अंघोळी वगैरे झालेल्या. फ्रेश. )

प्रभाः तू वेडेपणा करू नको - मी सांगते तुला - ते दोघं या बाबतीतच विचार करत बसले असतील कुठल्यातरी हॉटेलात किंवा एखाद्या वकीलाकडं गेले असतील. ( संगीता गप्प. ) नुसती गप्प बसू नको - बोल काहीतरी. असं वागून काय चांगलं होणार आहे ? आणि हे तरी काय आहे ? नुसतं बघणं, हाताला हात लावणं एवढंच ना ? का याच्यापुढं जाणार आहेत तू ? आणि एखाद्या वेळी एखाद्यानं जास्त फायदा घेतला म्हणजे काय करणार ? मग पुढं कसलं जिणं वाट्याला येईल ते समजतं का तुला ? आम्ही काही कुठं बोलणार नाही. अजून चुकले म्हण, क्षमा माग, पुन्हा अशी चूक करणार नाही म्हण. पुरुषांनासुध्दा शक्य तो जमवून घ्यायचं असतं. फार टोकाला जायला लागलं तर माघार घेणं हे कुठल्याही बाईच्या फायद्याचं असतं. मलाही माघार घेणं फार कठीण जातं - पण अती झालं तर, आपलं बरोबर असलं तरी माघार घ्यावी. आणि तशी खूप चांगली आहेस तू. हा काही अगदी मोठा गुन्हा झालेला नाही. पण लग्नानंतर कुठला नवरा असं खपवून घेईल गं ? जपून वागावं, मर्यादा ठेवावी. पुरुषाच्या डोळ्यांकडे बघून बोलू नये म्हणजे काही असलं होत नाही. थोडा तुटकपणा ठेवावा. बोलणं नीट ठेवलं तरी चालतं पण अंतर ठेवावं. जवळीक निर्माण करणारं, आहारी गेल्यासारखं बोलू नये. एवढं केलं की कुणी नादी लागत नाही. मुख्य म्हणजे असं कुणी नादी लागू नये अशीच आपली इच्छा पाहिजे. मग काही होत नाही. पटतंय का तुला ? ( संगीता गप्प. ) अगं, कुणाशी बोलतेय मी ?

संगीताः ए, आपण पुन्हा एकदा चहा घेऊ या ?

प्रभाः अग, हो बाई, घेऊ या चहा - पण तुझ्यावर कसला प्रसंग येतोय ते लक्षात येतंय का तुझ्या ? तुझा नवरा तुझ्याशी चांगलंच वागत राहील असं समजू नको. एरवीचं तात्पुरतं रागावणं आणि हे रागावणं यांच्यांत फरक आहे. योग्य ते महत्त्व दे याला - विचार कर. जागी हो, रड, चुकले म्हण -- माझ्यामुळं तुम्हाला मनस्ताप झाला म्हण. पुन्हा रड. इतकं सगळं केलं पाहिजे. लक्षात येतंय का तुझ्या ? अगं, नवरा आपल्यावर चिडतो ते चांगलं चिन्ह असतं - म्हणजे तो आपल्यालाच सुधारायच्या प्रयत्नात असतो - उलट तो चिडत नसला तर आपल्याव्यतिरिक्त काहीतरी त्याच्या डोक्यात चालू झालंय अशी शंकेला जागा असते- तो चिडतोय - संतापतोय तोपर्यंत तुला संधी आहे - आणि चिडणं, संतापणं चांगलं असण्याचा हा नियमसुध्दा त्याला संताप किती झेपतो तेवढ्या मर्यादेपर्यंतच चालतो -- माझीसुध्दा ती मर्यादा ओलांडली जातीय -- तर मलासुध्दा प्रश्न पडलाय -- मी सुध्दा लक्षात ठेवून आपल्या स्वभावाला थोडा आवर घातला पाहिजे अशा विचारात आहे -- ऐकतीयस का तू ? तू चांगली आहेस. तुझा नवरा चांगला आहे. तुम्हाला मूलही होणार आहे - आणि मूल झाल्यावर त्याच्यातसुध्दा खूप रमून जाशील तू - माझं ऐकायचं असलं तर हे मोडू देऊ नकोस तू - हे टिकवायचा प्रयत्न कर - प्रयत्न कसा करायचा ते सांगितलंच मी तुला - पाहिजे तर मानसोपचार तज्ञाकडे जायला तयार हो - मीपण येते तुझ्याबरोबर - माझा स्वभाव असा चिडचिडा आणि तापट का झालाय तेही तपासून घेऊ - काही औषधं दिली तर घेऊ दोघीही . फरक पडला तर बरंच आहे - काय ?-- बरं चल, चहाच करू आपण - आणि ते दोघं आलेला आवाज आला तरी बाहेर येऊ नको - पारा चढवायला सध्या तरी कारण नको - तुझ्यावर आणि

माझ्यावर दोघींच्यावरही उपाय करायचं संगनमत चाललंय त्यांचं - यशस्वी होवोत बिचारे - चल --

( दोघीही आत जातात. काही क्षण शांतता. मग दारावरची बेल वाजते. प्रभा येऊन दार उघडते. दारात लक्ष्मणराव उभा. प्रभा त्याला ' या ' म्हणत नाही - दारातच उभा करते'-- )

प्रभाः काय काम आहे ?

लक्ष्मणरावः माझं काही काम नाही - तुमचंच माझ्याकडे काम आहे.

प्रभाः हे घरात नाहीत - नंतर या -

लक्ष्मणरावः माझ्या घरी निरोप ठेवून गेले - दोन अर्जंट कामं आहेत म्हणून - मला निरोप पोचला म्हणून आलोय -

प्रभाः आज त्यांना ऑफिसच्या कामात लक्ष घालायला वेळ मिळणार नाही.

लक्ष्मणरावः घरचं काम आहे ताई ! पाचदहा मिनिटं थांबतो - येतीलच ते -

प्रभाः काल चिडून निघून गेलात आणि आता परत कशाला आलात ?

लक्ष्मणरावः तुमचा खून करायला सांगत होतो मी त्यांना --

प्रभाः माझा ? का ? - या आत - बसा -

लक्ष्मणरावः त्यांची पध्दतच चुकीची होती हे त्यांना कळणार कसं त्याच्याशिवाय ? - आणि हे कातडीबचाऊ लोक खूनबीन करत नाहीत हे मला माहीत आहे - काहीही नुकसानीचा धोका न घेता त्यांना फायदा पाहिजे असतो - आता आले ना पुन्हा माझ्याकडं ? -- आता माझं ऐकतील तरी --

प्रभाः म्हणजे काय आहे ? मला काहीच कळत नाहीय - कसलं बोलणं झालं होतं तुमचं काल ?

लक्ष्मणरावः तुमच्याबद्दलच ! तुम्ही डोकं फिरवता तुमच्या नवऱ्याचं ! असल्या प्रश्नांवर माझ्याकडं उपाय असतात - म्हणून बोलावलं होतं त्यांनी - काम फार टोकावर आलंय हे तुम्हीही ध्यानात घ्या -

प्रभाः म्हणजे तुम्हाला देवबीव प्रसन्न आहे का ?

लक्ष्मणरावः देव असेल नाहीतर देवी असेल -- तुमचं घर पेटू द्यायचंय का तुम्हाला ?

प्रभाः मग मलासुध्दा सांगा नं उपाय - मी करीन - देवाधर्माचं हे काही करत नाहीत -

लक्ष्मणरावः दुसरं कुणाचं आहे ?

प्रभाः माझी एक मैत्रीण आहे-- तिचं वागणं बरोबर नाही म्हणून तिचा नवरा संतापलाय तिच्यावर -- यांचा मित्रच आहे-

लक्ष्मणरावः असूं दे - तुम्ही बसा आत - मी बघून घेईन--

प्रभाः पण खुनाबिनाचं नाही ना ?

लक्ष्मणरावः खून होणार असला तर कुणी थांबवूही शकत नाही - आणि एकदा तो क्षण गेला की खून होतही नाही -- जा तुम्ही - बसा - काळजी करू नका - ( प्रभा जाते. लक्ष्मणराव निश्चल बसून राहतो. बसलेला. आपल्याच विचारात. मधेच त्याला हलकेच हसू येते. त्यातूनच -- स्वतःशीच बोलत असल्याप्रमाणे -- ) लक्ष्मणरावा, का येतात रे बाबा ही माणसं तुझ्याकडे ? काय जादू, चमत्कार करतोस का काय ? भिंत चालवता येईल, पण माणसांचे प्रश्न सोडवून देणं ? इम्पॉसिबल ! बरं, यांना आधी जागं करायचा प्रयत्न करा, ऐकणार नाहीत ! स्वतःची पोरंपण ऐकत नाहीत तर यांचं काय ! आवडीनिवडी फिक्स करत जातात ! खाद्यपदार्थ, त्यांच्या चवी, कपडे, त्यांचे रंग एवढंच काय विचार कुठले आवडतात ते पण फिक्स करत जातात ! अरे बाबांनो, जितकं जास्त फिक्स होत जाल तितकं दुःख वाढवून घ्याल आयुष्यात ! पण ऐकणार नाहीत ! आपल्या आपल्या कामात खूप हुशार होतात पण जगण्याच्या कामात ढ ! पैसे खूप मिळवतात पण कुठलंही संकट आलं की यांच्याइतकं दरिद्री कुणीच नाही ! ' हा ऽ काय निसर्ग, कित्ती छान !', ' हा ऽ काय रोषणाई, कित्ती छान ! ' आणि ' शी ऽ काय हा उकाडा ! ', ' शी ऽ काय ही शांतता ! ' -- असं यांचं चालू असतं ! मग काय म्हणतात, ' पंखा असून, एसी असून उकाड्यात बसू का ? ' अरे , नको बसूस येड्या, पण सारखं मनानं हा ऽ हू ऽ करू नकोस ! ही सवय तुला खड्डयात घालेल ! मन कसं चालतंय ते बघायचं नाही -- ते चालेल, पळेत तसं पळत राह्यचं ! या पध्दतीत संकटावर, दुःखावर काहीच उपाय नसतो येड्यांनो ! ते भोगणं एवढंच असतं त्यात ! आणि संकटं -- दुःखं ओढवून घेणंही असतं त्यात ! मग काय म्हणतात, सारखी कटकट नको हो, दुःख येईल तेव्हा पाहू, आत्ता तर मजेत जगू द्या ! म्हणजे तेच ! त्यामुळं, स्वतःची पोरं जरी खड्डयाच्या दिशेनं जातायत असं दिसलं तरी गप्प बसावं लागतं ! मरा खुळचटांनो, मी काय करणार ! माझा यात फायदा आहे का तोटा आहे ! बघा तुमचं तुम्ही ! माझं म्हणाल तर मला खऱ्याचा आणि खोट्याचा कशाचाच

दोष नाही ! खऱ्याचा दोष कुठला? मी खरा हा अभिमान हो ! आणि खोट्याचा ? आपल्या फायद्यासाठी खोटं वापरणं हो ! तुम्हाला नाही कळायचं, तुम्ही फिरा असेच बोंबलत ! पार्वतीमाता एकदा भगवान शंकरांना म्हणाली की देवा, देवदेवताही एकमेकांशी भांडतात, डावपेच करतात, सुखदुःखातनं आणि भीतीतनं जातात आणि पृथ्वीवर माणसांचंही तेच चालू असतं तर त्या माणसांपेक्षा, देवा, आपण वेगळे कसे ? भगवान शंकर गळ्यातल्या नागाच्या फण्यावरून हात फिरवत म्हणाले, वेडी आहेस ! त्यांच्याच डोक्यांतून आपण निर्माण झालो आहोत तर आपण वेगळे असणारच कसे !त्यांनीच आपल्याला जन्माला घातलंय ! ती आपली लेकरं नाहीत, आपण त्यांची लेकरं आहोत ! एवढे भगवान शंकरांचे बोलून होताच भगवान शंकर आणि पार्वतीमाता दोघेही अंतर्धान पावले ! ( स्वतःशीच हसतो. काही क्षणांनंतर रवी आणि विजय येतात. लक्ष्मणरावाला पाहिल्यावर चेहरे जरा खुलतात - )

रवीः अरे ! आलेलेच आहेत !

विजयः व्हेरी गुड !

रवीः आमचं म्हणणं लक्ष्मणराव, तुम्ही रागावून बोललात ते काही आम्ही मनावर घेत नाही - आमचंही चुकलं असेल - पण खरंच काही चांगला मार्ग नाही का याच्यावर ? सदानंदही -- म्हणजे आमच्या ऑफिसातला शिपाई -- तोही म्हणाला की तुम्हाला पुन्हा भेटा म्हणून --

लक्ष्मणराव : म्हणजे खुनाचं काही जमत नाही -- ! ?

रवीः नाही --

विजयः नाश न होताच मार्ग निघावा हे बरं - पण तो का मार्ग सांगितला तुम्ही ?

रवीः आम्हाला वाटलंच की पुन्हा एकदा तुम्हाला भेटल्यावर कदाचित् - पण असं का बोललात तुम्ही ?

लक्ष्मणरावः स्वभावातली तेढ असली आणि तोच प्रश्न धरला तर दुसरा मार्गच नसतो -

रवीः बरं ठीक आहे - सांगा आता - तुम्ही म्हणाल तसं -

लक्ष्मणरावः बरं - दुसरं काम कुणाचं आहे ?

रवीः याचं - याचं नाव विजय - माझा मित्रच आहे - याची बायको वागायला बरोबर नाही -

लक्ष्मणरावः नवरा बायकोतलं आहे एवढं सांगितलं की बास ! कशामुळं ते लागत नाही मला ! कारण काहीही असो, टोकाला आलंय एवढंच महत्त्वाचं - कारणांमध्ये लहान,मोठी,गंभीर,किरकोळ - असले फरक नसतात -

रवी : असं कसं म्हणता ? कारणं लहान, मोठी, गंभीर, किरकोळ अशी नसतात ?

लक्ष्मणरावः कुठल्या कारणावरनं किती पेटावं आणि कुठल्या टोकापर्यंत जावं याचे काही नियम सापडलेत कुणाला? ( विजय रवीला खूण करतो.)

रवी : हां -- नाही -- हे बरोबर आहे -- सॉरी -- पुढं --

लक्ष्मणरावः मी फक्त खरं तेच बोलतो हो !

विजयः बरं, मग सांगा उपाय -

लक्ष्मणरावः मुळांत माझ्यावर विश्वास आहे का तुमचा ?

रवीः दुसरी जागाच नाही आता विश्वास ठेवायला -

विजयः हो ना !

लक्ष्मणरावः म्हणून माझ्यावर विश्वास ! जमायचं नाही. बेडकांना चाबकानं फोडलं म्हणजे जत्रा भरायची थांबते असं काही नाही.

विजयः हां, आता कळलं !

रवीः बरोबर आहे तुमचं म्हणणं ! बेडकांना चाबकानं फोडून काहीच उपयोग नाही -

लक्ष्मणरावः काढा मग शंभर शंभर रूपये.

रवीः शंभर ?

विजयः करणार काय पण ?

लक्ष्मणरावः बोजा उचलायचाय नं -- मग हमाली द्यावीच लागेल -- नगाला शंभर हा एकच रेट आहे -- फरक नाही --

विजयः बरोबरच आहे -- कारणांत लहानमोठं काही नसतं म्हटल्यावर रेट एकच असणार -- ( रवी दोनशे रूपये आणतो. )

रवीः ( विजयला ) तुझेही मी देतो सध्या -

विजय : हं - दे !
लक्ष्मणरावः बाया आहेत नं - त्यांना बोलवा - त्यांना माहीत आहे का ?
रवीः त्यांना बोलवावं लागेल ?
विजयः त्यांना माहीत नाही -- आम्हाला वाटलं आमच्या बाजूनं हा एक प्रयत्न आहे -
लक्ष्मणरावः का ? तुमचं बरोबर आहे म्हणून ? मग खून करा -
रवीः नाही, नाही, बोलावतो - ( रवी आत जातो. )
लक्ष्मणरावः प्रश्न दोघांचा धरायचा - दोघांनी एकत्र मिटवायचा -
विजयः हं - आता काय तुम्ही म्हणाल तसं -
लक्ष्मणरावः अजून पैसे परत घ्या -
विजयः नाही नाही -- तसं नाही - ( रवी, प्रभा, संगीता येतात. )
लक्ष्मणरावः माझ्यावर यांनी विश्वास टाकलाय - तुमची भांडणं होऊ नये म्हणून उपाय करायचाय - तुमचं काय म्हणणं आहे याच्यावर ?
प्रभाः चालेल -
लक्ष्मणरावः या बाई काय बोलत नाहीत ?
संगीताः हं -
लक्ष्मणरावः विश्वास नसला तर सांगा - मी चाललो -- का फुकट मरताय उगीच ?
प्रभाः ( संगीताला -- ) करायचा नं उपाय ? विश्वास आहे नं तुझा ?
संगीताः हो -
प्रभाः मग बोल नं घडाघडा - का मीच बोलू तुझ्या वाटचं ? तुझी इच्छा आहे का नाही ?
संगीताः आहे -
लक्ष्मणरावः ठीक आहे -- ( पिशवीतून दोन फ्रेम्स काढतो - ) एकदम् साधं काम आहे - हे यंत्र आहे - घरात लावायचं -- आपापली अंघोळ झाली की याच्यापुढं हात जोडून उभं राह्यचं आणि " आमचं भांडण मिटू दे " असं मनात म्हणायचं - मग आपल्या रोजच्या कामाला लागायचं - अनुभव घेऊन बघा - नास्तिक असलात तरी उडवून लावू नका - सगळी बरबादी होण्यापेक्षा हे मनापासून करा - पंधरा दिवसांनी मी परत येईन - काम नाही झालं तर पैसे परत देऊन जाईन - ( रवी आणि विजय यांच्या हातात एकेक फ्रेम देतो - ) जातो मी -
( जातो. रवी आणि विजय फ्रेम धरून एकमेकांकडे पाहात उभे - )
रवीः च्यायला, गंडवलं का काय !
विजयः बोलावू का त्याला ? मलासुध्दा अंधश्रध्दा वाटतीय ही -
प्रभाः राहूं द्या हो - करून तर पाहू -
( संगीता मान खाली घालून उभी. रवी यंत्र पाहतोय. विजय संगीताकडे पाहतोय. प्रभा विजयकडे पाहतेय. अंधार होत जातो... पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा --सुटीचा दिवस. पंधरा दिवसांनंतरचा. रवी अंघोळ करून फ्रेश - वर्तमानपत्र चाळत बसलेला. समोर ती यंत्र-फ्रेम लावलेली. प्रभा अंघोळ झालेली येते. फ्रेमपुढे नमस्कार करून दोन मिनिटे उभी राहते. मग जाऊ लागते--.)
रवीः तुझा प्रयत्न छान आहे - या पध्दतीनं बरंच सुधारेल सगळं - मुलं चकित होतील आल्यावर -
प्रभाः तुमचा सुध्दा मला प्रोत्साहन देण्याचा आणि स्वतःचा स्वभाव बदलण्याचा प्रयत्न चांगला आहे -
रवीः ( नाराजीनं - ) बरं ठीक आहे, चला, दोघांचेही दोष होते - ते कमी होतायत -
प्रभाः तुम्हीसुध्दा सुधाताय हे चांगलंच आहे -- त्याचा अपमान वाटून घ्यायचं काही कारण नाही - ( आत जाते. )
रवीः ( प्रेक्षकांशी -- स्वगत -- ) या सगळ्याचा खरा सारांश सांगायचा झाला तर मी सुधारतोय हेच खरं आहे - मला हे लक्षातच येतंय की तिच्या अहंकाराचा हळूहळू विजय होतोय - मानसोपचारतज्ञांचं म्हणणं असं की ती लाडावलेली मुलगी आहे आणि घरात आपलं वर्चस्व राहणं ही तिची मानसिक गरज आहे - आणि मी स्वाभिमानी असल्यामुळं तिचं वर्चस्व मी मानत नाही - माझ्या आवडीप्रमाणं जगावं असं मला वाटतं - पण ते तिच्या आवडीप्रमाणं होत नाही - असंच काहीतरी त्यांचं म्हणणं होतं - थोडं तिनंही नमतं घ्यावं - थोडं मीही तिच्या इच्छेप्रमाणं वागावं वगैरे सल्ला मिळाला - हिचा संतापीपणा कमी होण्यासाठी काही

गोळ्या दिल्या -- याच्यात झालं काय पण ? - मी माझं वाचन बरंच कमी केलं - हिच्याबरोबर रोज संध्याकाळी फिरायला जायचं चालू केलं - किराणा,भाजीपाला यांची जबाबदारी माझ्यावर घेतली आणि एवढं असूनही शिवाय तिचं कटकटीचं किंवा आपलं वर्चस्व दाखवण्याचं बोलणं आलं की सहानुभूतीनं थोडं थोडं दुर्लक्ष करायला लागलो -- अगदी सगळं आदर्श जमतंय असं नाही - पण बरंचसं असंच आहे - म्हणजे सुधारलं कोण ? मी सुधारलो -- मुळात तिच्या डोक्याचा सारखा भडका उडत राहणं आणि त्रासिकपणा वाटत राहणं ही तिची विकृती म्हणायला पाहिजे ना ? पण सुधारावं लागतंय मला - मला तर हे विकृतीला शरण चालल्यासारखं वाटतं - पण आख्खी दुनियाच खऱ्याची नाही तिथं घर तरी खऱ्याचं कसं असणार ? - त्यांचं म्हणणं काय - आजारी माणसाची सेवा करतो की नाही आपण ? -- तसंच -- समजा, तुमच्या मते एक स्वभावदोष आहे - विकृती आहे - तर ती विकोपाला जाऊ नये याची तुम्हीसुध्दा काळजी घ्यायला पाहिजे - आणि असं करून एकदा चांगलं वातावरण तयार झालं - एकमेकांचं प्रेम, सहानुभूती, त्याग वगैरे आलं की मग दोन्ही बाजूंनी प्रॉब्लेम राहणार नाही-- सारांश म्हणजे खरा प्रश्न मीच सुधारण्याचा होता -- मला खरं म्हणजे हे रोगट जगणं वाटतं - पण असं चाललंय खरं - दिसायला तरी वातावरणात सुधारणा दिसतीय - मुलंसुध्दा खूष होतील -- पण आपल्या आवडीप्रमाणे - आपल्या स्वभावाप्रमाणे जगता येत नसेल तर जगणं कसलं ते ? ते तर ओढत राहणं आणि ढकलत राहणं -- आता काहीजण - विशेषतः निरनिराळ्या वस्तूंच्या आणि घटनांच्या जगात रमणारे लोक - प्रश्नाला प्रश्न न म्हणता तसंच एंजॉय करत आणि भलेबुरे अनुभव घेत जगतही असतील -- पण एकूणात मला असा विचार येतोच की एकमेकांच्या स्वभावांना छेद जाणाऱ्या जोड्याच कशा बरोब्बर तयार होत असतील ? आणि इथं मात्र मला अशी एक शंका येते की माणसाचा स्वभाव ही गोष्टच अनैसर्गिक असावी -- स्वभाव, आवडीनिवडी ही निसर्गाच्या दृष्टीनं एक विकृतीच असावी आणि ती विकृती नष्ट करण्याचं काम सतत चालू असावं -- या विचारानं मात्र मला एक जरा सुप्त समाधान वाटतं - असो ! विजय येतो -- आला ! ( विजय येतो. ) ये, ये । बस ! ( विजय बसतो. ) काय, तब्बेत कशी काय ? जगणं पहिल्यापेक्षा सुसह्य वाटतंय नं ?

विजयः हं --

रवीः एकटाच आलास ? संगीतावहिनी कुठाय ? आज सुट्टी म्हणून मुद्दाम दोघांनाही एकत्र यायला सांगितलं होतं -

विजयः येतीय ती -- काही फळं घेऊन येते म्हणाली -

रवीः बरं, कशी काय प्रगती ?

विजयः त्या सायकिआट्रिस्टनं असं काढलंय की हिची बहीण, आणि भाऊ हे हिच्यापेक्षा फार हुशार आणि ब्राइट करीअरचे होते - त्यामुळं हिच्या मनात एक न्यूनगंड तयार होत गेला - त्याची भरपाई तिनं आपलं व्यक्तिमत्व आकर्षक बनवण्यानं करायला सुरुवात केली - आपण दुसऱ्याला आकर्षित करू शकतो असं झालं की न्यूनगंडावर मात केल्यासारखं तिला वाटतं - न्यूनगंड आणि अहंगंड मुळात एकच असतात म्हणाले - दुसरं म्हणजे हल्लीची ही स्पर्धा आणि तुलना यांमुळं समाज अधिकाधिक रोगट होत जाईल म्हणाले -- म्हटलं समाजाचं जाऊं दे ! याचं काय ते सांगा - तर दोन, चार, पाच सिटिंगमधे हळूहळू तिचा न्यूनगंड कमी होईल म्हणाले - दरम्यानच्या काळात तिला कुठलाही मनस्ताप होऊ नये याची काळजी घ्या म्हणाले - काही गोळ्याही दिल्या - थोडक्यात काय तर मला होणारा मनस्ताप मी सहन करू शकतोय नं तर मी तिच्या मनाची काळजी घ्यायची - आणि ती कमकुवतच असल्यामुळं माझ्या मनाची तिनं काळजी घेण्याचा प्रश्नच नाही -- शिवाय ते यंत्राला नमस्कार करणं चालूच आहे --

रवी बरं, पण या सगळ्यानं काही सुधारणा ?

विजयः सुधारण झाली तरी घोटाळाच होतो रे !

रवीः ते कसं काय ?

विजयः आता हिच्या वागण्यात योग्य तो तुटकपणा आलाय - तिनं त्याच्याशी बोलणं जवळजवळ बंदच केलय - आणि वागण्यात एक त्रयस्थपणा आणून एक असं अंतरच निर्माण केलंय - थोडक्यात म्हणजे तो चोरटेपणाचा भाग संपुष्टातच आणलाय --

रवीः गुड !

विजयः पण त्याचा परिणाम असा झालाय की तो इसम रोज दारू पितोय - दुःखी राहतोय - आपली बायको

दुसऱ्या एखाद्या माणसापासनं दुरावल्यामुळं त्या माणसाचं दारू पिणं हे पण च्यायला वैतागच आहे रे ! भयंकर अपमान वाटतो, आणि तिलाही हे दिसतंच की ! पण ती याच्यावर काही एक्सप्रेशनच दाखवत नाही - त्यामुळं हिलापण वाईट वाटत नसेल ? - अशी शंका येते - बदलत्या परिस्थितीमुळं ती अशी दडपून राहात असेल का या शंकेन संताप होतो मनाचा - बरं आता एवढ्यावरून जागा बदलायचा प्रयत्न करायचा का ?-- शक्य नाही - आणि तो इसम समजा असं दुःखी राहिला किंवा समज मेलाच तर हा एक कायमचा डागच राहणार नं आमच्यातसुध्दा ? आणि त्याचं वाईट झाल्याचं हिला दुःख तर होत नसेल ? - अशी शंका कायमच माझं डोकं फिरवत राहणार -

रवीः आता हे मात्र तुला दुर्लक्षच करावं लागेल - सगळं नॉर्मल आहे असं धरून आणि मागचं विसरूनच चालावं लागेल - नाहीतर ही सुधारणा झाल्याचा उपयोग काय मग ? असं कुणीही काहीही मनाचे खेळ करून मरत बसेल - मेला तर मेला - त्याला काय करणार ?

विजयः हो, पण तो का मरतोय त्याचं असलं कारण आपल्याला माहीत असलं म्हणजे ? आणि तिच्या मनाचं याबाबतीत काय चाललंय हे कळू शकत नाही नं आपल्याला ! - या बाईच्या असल्या या भुक्कडपणामुळं सगळा विचका होऊन गेलाय नुसता !

रवीः म्हणजे खरोखरची समज सुधारणा झाली आणि एखाद्या चांगल्या गृहिणीसारखं जरी संगीतावहिनी वागली तरी तू मागचं आठवून त्याचा अर्थ लावायचा प्रयत्न करणार - हे मिटायचं कधी मग ?

विजयः मुळात हे असं व्हायलाच नको होतं. आपण लग्न केलंय - घर चालवायचंय - ही साधी जबाबदारी कळायला नको ? हे बेजबाबदार वागणार आणि हे मिटवायचं कसं हा विचार आपण करायचा ! मूर्खाला सगळं माफ आणि शहाण्याला सगळी जबाबदारी - असलं आहे हे !

रवीः अरे पण तुझं प्रेम पहिल्यासारखं प्यूअर झालं असं जर का तुझ्या बायकोला वाटलं नाही तर पुन्हा ती प्रेमाचं ठिकाण दुसरं कुठं शोधायला लागली म्हणजे ? नॉर्मल प्रेमाची गरज असणारच नं तिला ! तू जर असं मागचं आठवून डोक्यात राख घालत बसलास तर प्रेमासाठी तिनं कुणाकडे पाह्यचं ?

विजयः बरोबर आहे - हे पण लफडं आहे सालं यात - म्हणून मी सांगू का तुला - एकदा अशी तेढ निर्माण झाली नं की घटस्फोटच घ्यायला पाहिजे - नंतर कठीणच होतं ते !

रवीः थोडंसं क्षमाशीलपणा करायला तयारही असतो माणूस - याला काहीही निश्चित अशी पध्दत नाही -

विजयः फरफटत राहणं आहे नुसतं !

रवीः लोक म्हणतात, खून करणं, हाणामारी करणं वगैरे असंस्कृतपणाची लक्षण आहेत - आणि सुसंस्कृतपणाची लक्षणं म्हणजे ही - आपली चाललीयत ती - हळूहळू सडत राहणं म्हणजे सुसंस्कृतपणा -- प्रत्येक प्रश्न विचार करकरून पिसत राहणं आणि हळूहळू सडत राहणं --

विजयः आता साधं बघ - मला असं वाटलं समजा की आमचं आता चांगलं आहे असं प्रोत्साहनपर बोलावं - म्हणून समजा ती आल्यावर मी तुला म्हणालो की आम्ही आता मस्त आनंदात आहोत - तर लगेच विचार असा येतो की तो मनुष्य तिकडं दुःखात पिचतोय आणि मी आनंदाचं बोलतोय - म्हणजे नकळत मी क्रूर आहे असं तर तिला वाटणार नाही ?

रवीः संगीतावहिनीला खरंच एवढं सुचत असेल सगळं ? का तुझंच कल्पनेनं चाललंय हे ?

विजयः हे एका क्षणात वाटणं शक्य आहे रे - ते फोड करून बोलायला वेळ लागतो -

रवीः म्हणजे फार आनंद दाखवून उपयोग नाही - मग साधारण काय दाखवणं बरोबर होईल ?

विजयः तेच तर कळतं नाही ना ! आणि समज याचा समतोल साधणारा एक धागा लक्षात आला - तर त्याच धाग्यावर कसरत करणं मला जमलं पाहिजे ना ! आणि मला जो धागा समतोलपणाचा वाटतो त्याच्या शेजारचा समज तिला समतोलपणाचा वाटत असला म्हणजे ? तिची ती अपेक्षा असली तर ?

रवीः एवढं सूक्ष्म असेल हे ?

विजयः काय हरकत आहे ? अरे, बोलायला वेळ लागतो पण मनाचं हे एका क्षणात घडू शकेल - आणि तिचं मन कोणत्या अवस्थेत आहे आणि कसं चाललंय याची प्रत्येक क्षणी हुबेहूब कल्पना करून त्याप्रमाणे योग्य ते वागणं - असं शक्य आहे का ?

रवीः छ्यॉ !!

विजयः बरं, तुमचं कसं काय ?

रवीः आमचं पण जरा वेगळ्या प्रकारे तुमच्यासारखंच सूक्ष्म आहे पण नको आता ते तंतू काढत बसायला - जी

काय सुधारणा वाटतीय ती तिच्या पुढाकारामुळंच असा अहंकार दिसतो तिच्या वागण्यात - ती पूर्वीपासून जे म्हणत होती तो आता माझ्या डोक्यात प्रकाश पडतोय असं दाखवते ती - पण, थोडक्यात म्हणजे बरं आहे !

विजयः बरं आहे तर चांगलं आहे मग ! आमचंही बरं आहे !

रवीः बरं आहे तर चांगलं आहे मग !

विजयः दुसरा एक सूक्ष्मपणा सांगू का ?

रवीः माझ्या डोक्याला झेपेल का हे सगळं एका वेळी ? नाहीतर नंतर सांग -

विजयः सांगतोच - ( दारावरची बेल वाजते. रवी जाऊन दार उघडतो. प्रभा बाहेर आलेली. संगीता येते.)

प्रभाः अगं ये ये संगीता ! आज तू अगदी ताजीतवानी आणि आनंदी वाटतीयस ! अगं, ही साडी कधीची तुझी ?

संगीताः अगं, लग्नाच्या वाढदिवसाची ! तू पाहिली नव्हतीस ?

प्रभाः अय्या, मी नव्हती पाहिली अगं ! मस्त आहे - आणि तुला तर छान खुलून दिसतीय - असे रंग पण तुझ्यासारख्या गोऱ्या लोकांनाच छान दिसतात - माझ्यासारख्यांना फेंट कलर्सच चांगले -

संगीताः काही नाही - तुलासुध्दा चांगला दिसेल अगं हा रंग - तू तरी काय काळी थोडीच आहेस ?

प्रभाः तुझ्यापेक्षा जरा डावी अगं ! बरं चल, उशीर का केलास तू ?

संगीताः अगं म्हटलं काहीतरी फळं घेऊन जावं - म्हणून मग हा पुढं आला आणि मी येतेच म्हटलं लगेच -

रवीः वहिनी, अगं कशाला फळं न् बिळं आणत बसलीस ?

संगीताः हे खरं म्हणजे विजयला सुचलं -

प्रभाः बरं, चांगलंच आहे, चल !

विजयः प्रभावहिनी, जेवणाबिवणाचं होऊं द्या सावकाश - अगोदर एक चहा झाला तर छान होईल -

प्रभाः करते नं ! अहो, असं हक्कानं सांगितल्यावर करायला काही वाटत नाही आम्हा बायकांना - उलट आनंद वाटतो -

विजयः हे तर छानच आहे मग ! ( त्या दोघी आत जातात. )

रवीः आता हा आत्ताचा सीन समज एखाद्या तिऱ्हाईतापुढं घडला असता तर यांच्यांत -- म्हणजे आपल्यांत -- अनेक सूक्ष्म धागेदोरे आणि तंतू चाललेत अशी शंका तरी येईल का कुणाला ? हेच सतत जमलं पाहिजे ! नुसतं नवराबायको एकत्र असताना पण जमलं पाहिजे !

विजयः मला तर असं सतत वेगळ्या लेव्हलवर जगता येणार नाही - मला तर हिडीस वाटतं हे सगळं -

रवीः नॉर्मल जगणं म्हणजे सुध्दा कुठलीतरी लेव्हल असतेच आणि तीसुध्दा कृत्रिमच असते -- ती आपल्या स्वभावाला सूट होणारी लेव्हल असते इतकंच --

विजयः माणसाचं जगणंच भिकार आहे सालं ! काही अणुयुध्द झालं तरी हरकत नाही - याच्यात मौल्यवान असं ठेवण्यासारखं काही नाही - हे काय होतंय - यांची डोकी नीट करण्यासाठी आपली बिघडवून घ्यायची -

रवीः थोडे दिवस असंच हास्यविनोद, गप्पा-टप्पा, जाणंयेणं, प्रवास, समारंभ यांच्यांत जर अशी गर्दी करून घालवले तर विसरलं जाईल ते सगळं - आणि नवराबायकोतल्या संबंधाचा एक नवीनच टवटवीत बंध तयार होईल त्याच्यातून-

विजयः ती सुधारतेय की नाही याची खात्री नाही आणि मी मात्र बिघडतोय असं व्हायला लागलं तर अजूनही माथेफिरूपणा होईल माझ्या हातून असं वाटतं - सतत एक धोकाच वाटतो - त्यात परत दिवस गेलेत तिला - तेही नाजूकच काम आहे - या दिवसांत तिची मनःस्थिती बिघडलेली राहिली तर त्याचा होणाऱ्या मुलावरही वाईट परिणाम होणार ! चांगलंसुध्दा आपोआप व्हायला पाहिजे सालं ! त्याच्यासाठी असा सारखा प्रयत्न करायला नाही लागला पाहिजे !

रवीः बरं, आज आता पंधरा दिवस होतायत - समजा तो लक्ष्मणराव आलाच अगदी ईमानदारीनं विचारायला - तर काय सांगायचं ? त्याच्या यंत्राचा उपयोग झाला की नाही ?

विजयः ऐनवेळी काहीही सांगितलं तरी ते बरोबरच आहे - सध्याचं जे आहे ते तसं म्हटलं तर घटनांच्या ओघात आपलं आहे झालं ! - विशेष काय चांगलं झालंय ?

रवीः असं नाही - त्या यंत्रामुळं निदान दोघांनी एका दिशेनं प्रयत्न करायचाय ही भावना तर तयार झाली ? आणि तसं म्हटलं तर मूळ परिस्थितीत अनुकूल बदल आहेच की ! पूर्ण समाधानकारक नसेल !

विजयः तसं काय पैसे परत मागण्यात आपल्याला इंटरेस्ट  नाही  रे ! त्या गरीबाला नाराज करून काय करायचंय ?

रवीः आपलं आयुष्य इतकं निर्जीव वाटतं ! नुसते हे निरनिराळे विचार आणि त्यांचे गुंते याच घटना आपल्या आयुष्यातल्या ! दिसणाऱ्या अशा शारीरिक घटनासुध्दा घडल्या पाहिजेत -

विजयः तेही असतं की - जन्म, मृत्यू, भांडण, दिलजमाई, आजारपण, अपघात, शेजाऱ्याची नोकरी जाणं, मित्राच्या मुलाची आत्महत्या, मुलीचा प्रेमभंग - हे काय आहे मग ?

रवीः आपल्या हातून काही घडत नाही पण - म्हणून मला कधीकधी असं वाटतं की निदान सुतारकाम तरी शिकायला पाहिजे होतं आपण -

विजयः म्हणजे विचारांच्या घटना तुला सपक वाटतात - मला तर त्या भयंकर प्रक्षोभक वाटतात -

रवीः हं - हेही बरोबरच आहे - प्रक्षोभक असतातच त्या - ( प्रभा आणि संगीता चहाच्या कपबशा घेऊन येतात. प्रभाच्या हातात ट्रे - संगीता मागोमाग येते.)

प्रभाः कोण प्रक्षोभक असतं ? तसलं काहीही नकोय आता - नव्या पाटीवर नवा श्रीगणेशा समजायचा आता - आणि संगीता, तू सुध्दा मोकळेपणानं वाग आता - हास, गप्पा मार -

संगीताः होना - थांब, मी देते सगळ्यांना चहा - ( ती प्रत्येकाला चहा देते - सगळे चहा पितात.)

प्रभाः काही का असेना, वादळातून होड्या सगळ्या किनाऱ्यावर आल्या हे तरी छान झालंय  - संगीता, ही साडी इतकी खुलून दिसतीय तुला ! माझीच दृष्ट लागेल गं बाई तुला !

संगीताः काही नाही दृष्ट लागत - आणि एवढी कसली चांगली दिसतेय मी -

विजयः हिनं जास्त चांगलं दिसायचा प्रयत्न केलेलं मला आवडत नाही - तो प्रयत्न दुसऱ्या कुणासाठी तरी आहे असं वाटतं मला - आणि घडतंच तसं काहीतरी - ( संगीता कपबशी ठेवते - ) चांगलं दिसायचा हिचा प्रयत्न घाणेरडा वाटतो मला -- ( संगीता हुंदके देऊ लागते -- )

प्रभाः अगं, गप गप, असं काय ते -- उगीचच बोलले बाई मी - अगं गप ना -

विजय : ( संतापून उभा राहात - ) रडायला काय झालं तुला ? ( तिच्या रोखाने जात -- ) रडायला काय झालं ?  ( दातओठ खाऊन तिचा गळा दाबत -- ) कसलं दुःख वाटतंय तुला ?

रवीः ( उठून त्याला बाजूला घेण्याच्या प्रयत्नात -- ) अरे - अरे - असं काय करतोयस ! ( कसंबसं त्याला बाजूला घेतो. संगीता भेदरलेली. ओक्साबोक्शी रडत राहते. )

विजयः मारून टाकली पाहिजे सालीला ! रोग आहे साली - कीड आहे नुसती ! (  तोही धुमसतोय -- )

रवीः छे ! काय हे ! आपला काय प्रयत्न चाललाय आणि काय वागतोयस काय तू हे - छे !( प्रभाला -- ) -- तू तिला आत घेऊन जा - ( प्रभा तिला आत नेऊ लागते -- ) साधा हसतखेळत चाललेला प्रसंग आणि काय हे ! विजय, हे तुझं चुकतंय वागणं ! ( त्या दोघी आता जातात.) आवर घाल विजय स्वतःला - काहीतरी विचित्र घडून बसेल -- आणि घरात तुम्ही दोघंच असणार आहे -- त्यावेळी काय होईल मग ? ( विजय वैतागून बसतो, डोकं दाबून धरतो -- ) हे चांगलं नाही विजय, आपल्या चाललेल्या प्रयत्नांच्या अगदी विरुध्द होतंय हे -

विजयः ( उठून -- ) मी जरा बाहेर जाऊन येतो -

रवीः नाही -- कुठंही जायचं नाही - तू संतापलेला आहेस आत्ता -- कुठंही जायचं नाही -- ( विजय पुन्हा बसतो.) विजय, जो प्रकार आपण टाळायचं म्हणतोय तेच करतोयस तू --

विजयः मी घरी जातो -- मला जेवायची इच्छा नाही - तिला जेवून येऊ दे पाहिजे तर - मला स्वस्थ पडायला हवंय --

रवीः आता अशा मनःस्थितीत मी तुला घरी जाऊ देणार नाही. इथंच स्वस्थ पड हवं तर.  आणि जे काय जाईल ते दोन घास खा - तिनं एवढं आनंदानं केलंय - ते टाकून जायचं नाही - आणि तू असा गेलास तर आम्हाला जेवता येईल का ? आणि तुम्ही आणलेली ती फळं काय आम्ही खात बसू ? ( विजय धाडकन टीपॉयवर मूठ आपटतो. कपबशा वाजतात. एखादी पडते, फुटते.) शांत हो विजय - ( असं म्हणत रवी कपबशा, तुकडे उचलतो. ट्रेमध्ये ठेवतो. ट्रे आत ठेवून येतो - ) शांत हो - सबूरीनं घे - सगळं ठीक होईल - ती सगळं चांगलं करायच्या प्रयत्नात असताना तू असं वागणं काही बरोबर नाही - ( प्रभा येते.)

प्रभाः मला जिवंतच राहायचं नाही म्हणतेय ती -- समजूत घाला आता तिची -- काय हे ! ( आत जाते. )

रवीः जा आत, शांत कर तिला -- क्षमा माग अगदी वाटलं तर - चूक कबूल कर -- असं नाही उपयोगी -- ( विजयला उठवून -- ) चल -- बघ तिच्याकडे -- ( विजय आत जातो. रवी आतल्या दारापर्यंत जातो. एकदोन क्षण उभा राहून परत येतो. बसतो. वर्तमानपत्र हातात घेतो. ठेवतो. पुन्हा उभा रहातो. दाराच्या दिशेने जातो. परत येतो. बसतो. हाताच्या बोटांच्या अस्वस्थ हालचाली. काही क्षणांनी विजय बाहेर येतो.)

विजयः ( रवीकडे न पहाता -- ) तिला सांगितलंय मी -- रागाच्या भरात माझी चूक झाली म्हटलंय - तिनं शांत व्हायचं मान्य केलंय - शांत होतेय ती - काही काळजी करू नकोस -

रवीः हे काही ठीक नाही तुझं - अरे कशाचे काय परिणाम होतील याचा तिलाही अंदाज नसेल - आता कल्पना आलीय तिला - तू तिला एक संधी मोकळ्या मनानं दिली पाहिजेस -

विजयः जरा तोलच सुटला माझा -

रवीः अरे, पण अशा क्षणी काही भलतंच घडून बसलं म्हणजे ? मग पस्तावून काय उपयोग होईल ? हे असलं घडताच कामा नये -

विजयः हं - ह्या पुढे काळजी घेईन मी -

रवीः असल्या प्रसंगानं तिच्या मनात तुझ्याबद्दल भीती आणि तिरस्कार निर्माण झाला म्हणजे ? म्हणजे धीरानं इतकं सुधारत आलेलं पुन्हा कुठच्या कुठे मागं फेकलं जात नाही का अशानं ?

विजयः मुळात मी चांगलंच वागत होतो प्रेमानं पण तिनंच माझं डोकं फिरवलं -

रवीः अरे हो - तिची चूकच झाली - पण तेच सारखं डोक्यावर हाणून काय होणार ? मोडतोड होणार सगळी -- आणि इतकं मोठं गंभीर काही घडलेलं नाही -- एकदम टोकाला जाण्यापेक्षा एखाद्या चुकीला क्षमा करून संधी द्यायला नको ? आणि ती प्रामाणिकपणे चांगलं वागायचा आणि घडवायचा प्रयत्न करत असताना तू तिला तिच्या हातून झालेल्या चुकीकडेच सारखं ढकलायला लागलास तर कसं होईल ? आणि तू जसा विचार करू शकतोस तशी कुवत नाही तिची -- नाजूकपणानंच घ्यायला पाहिजे --

विजयः हे तू जे बोलतोयस ते खरोखरचे तुझे विचार आहेत का ? की प्रसंगाला घाबरून सुचतंय हे सगळं तुला ?

रवीः आपले विचार वगैरे काही खरं वाटत नाही मला - जीवनात नाशाचे मार्ग पत्करून चालणार नाही - नाश टाळलाच पाहिजे - हाच शेवटी माझा विचार - हा मुद्दा आपल्या बायकोच्या लक्षात येत नाही आणि समज आपल्या लक्षात येतो - तर आपली जबाबदारी वाढणारच --

विजयः आता सगळं वेगळंच बोलतोयस तू -- आणि तुझ्याही हातून असं काही घडू शकेल -

रवीः बरोबर आहे - पण चूकच असेल ती माझी - आणि अशा वेळी तू मला सावरलं पाहिजेस - ( क्षणभरानं --) तिला अगतिक करून टाकणं म्हणजे नाशाचा मार्ग निश्चित होणार मग --

विजयः मग आपल्या हातून काहीतरी घडलं पाहिजे - या तुझ्या बोलण्याचा अर्थ काय होतो ?

रवीः मी ते चुकीच्या अर्थानं बोलत होतो - आपोआप सर्वनाश व्हायचा असेल तर होईल तो होवो पण स्वतःहून नाशाची गती वाढवणं हे चूकच वाटतंय आता मला - नाश नकोच आहे घडायला आपल्या हातून --

विजयः याला मग प्रेतासारखं जगता आलं पाहिजे - भावना, विचार बंद झाले पाहिजेत - आपली स्वतःची ओळखच नाहीशी झाली पाहिजे - मन सतत शून्यावर राहिलं पाहिजे -

रवीः नेमकं कसं वागलं पाहिजे ते मला सांगता येणार नाही - पण हे नको -

विजयः विचार करून, ठरवून आपल्याला वागता येईल याच्यावरही विश्वास ठेवणं कठीणच आहे - एखाद्या क्षणाला स्फोटच होतो -

रवीः ठीक आहे - आता जरा वेळ काहीही विचारही नको आणि बोलणंही नको - गाणी लावतो मी -- ( विजय स्वस्थ बसलेला. रवी जाऊन टेपरेकॉर्डर चालू करतो आणि आत जातो. ' सर जो तेरा चकराए ' -- हे गाणे ' सुन सुन सुन...' पासून... काही क्षण... मग प्रकाश मंद मंद होत जातो. अंधार. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा जेवणं झालेली. चौघेही समोर. )

रवीः ओके. छान,छान.( कीर्तनकाराप्रमाणे - ) जेवणं झालेली आहेत - आणि तीसुध्दा कशी - तर - वादग्रस्त विषय पूर्णपणे टाळून ! अशा कुठल्याही विषयाला स्पर्शही न करता ! छान,छान ! मी काय म्हणतो,अजून थोडा वेळ असंच म्हणजे मूळ विषयापेक्षा वेगळंच असं दुसरं काही का जमू नये ? काय हरकत आहे जमायला ? जमेल,जमेल ! नेपोलियन तर म्हणायचा म्हणे की नथिंग इज इंपॉसिबल ! काहीच अशक्य नाही ! हरकत नाही... तर आपण ...असं करू या... काय करू या...हं ... आलोच -- ( जाऊन कागद

- पेन आणतो.)

प्रभाः मला वाटलं की काय करायचं ते माहीत असेल ! --

रवीः माहीत नव्हतं - पण आता माहीत आहे -- कमॉन -- हं -- असे बसा -- हं, म्हणजे बसलेले आहातच तुम्ही -- ( कागदाच्या चार चिठ्ठया करतो, त्यांवर काही लिहीत --) तर या चार चिठ्ठया आहेत - मी त्या खाली टाकणार-- प्रत्येकानं एकेक उचलायची -- अं -- ( चिठ्ठया ओंजळीत घेऊन घोळतो आणि टाकतो -- ) हं ! तर छान ! आता प्रत्येकानं उचला पाहू एकेक चिठ्ठी -- अ सॉर्ट ऑफ फन -- एक मजा -- हं -- ( उचलतात. विजय रुक्षपणे उचलतो. संगीता जणू आपले दुःख बाजूला ठेवून -- सामील व्हायला पाहिजे म्हणून उचलते.) हं -- उघडून बघा. हं -- सांगा आता, नंबर एक कोण ?

प्रभाः ( चिठ्ठी उंचावून ) मी ।

रवीः नंबर दोन ?

विजयः मी -

संगीताः नंबर तीन मी --

रवीः आणि अर्थातच मी नंबर चार ! आता असं करायचं की प्रत्येकानं कुठल्याही पिक्चरमधला कुठलाही भाग सांगायचा. ते दृश्य डोळ्यांपुढे उभं राहिलं पाहिजे - प्रथम नंबर एक - प्रभा, तू !

प्रभाः अच्छा - मीच का ? बरं - कुठला सांगू ... अगं, पिक्चर बघतो आपण पुष्कळ पण असं म्हणजे -- हं - अमिताभ बच्चनचा सांगू का ?

रवीः का ? तो तुला माझ्यापेक्षा जास्त आवडतो ?

प्रभाः वादाचा मुद्दा कट ! तुम्ही काम केलेलं पिक्चर असतं तर ते सांगितलं असतं - बरं ते जाऊ दे - हं -- मी असं करते - माझा भाऊ एका खेड्यात असतो- इलेक्ट्रिकल इंजिनीअर आहे तो -- तर त्या खेड्यातल्या एका टूरिंग टॉकिजमध्ये पाहिलेल्या पिक्चरचं सांगते --

रवीः हं - चालेल - मूळ मुद्याचं बोल, शक्यतो -

प्रभाः तर तिथं असं असतं, की सरसकट एक रुपया तिकीट -- त्यामुळं शक्यतो स्वस्तातले पिक्चर आणतात - ते तसेच असतात -- फिल्म तुटणारे वगैरे - तर पिक्चरचं नाव होतं ' रानी समजा अमुक तमुक '-- तर ती लहान असताना तिचं आख्खं कुटुंब एका दरोडेखोरानं ठार केलेलं असतं - ती सूडानं पेटलेली असते - पोहणं, घोडेस्वारी, पिस्तूलबाजी वगैरे शिकून घेते -- आणि मग त्या दरोडेखोराच्या शोधात निघते - वाटेत रात्र झाल्यावर एका गावातल्या झोपडीचं ती दार वाजवते - आत एक आई आणि तिची तरुण मुलगी अशा दोघी असतात - कोण, काय वगैरे होतं आणि तिनं ती रात्र त्या झोपडीत राहायचं ठरतं -- पण त्याच रात्री त्या गावावर दरोडेखोर चाल करून येतात - धावपळ, आरडाओरडा, घबराट होते - या दोघी मायलेकी जाम घाबरलेल्या असतात - रानी म्हणते, " माँजी, बहेनजी, तुम चिंता मत करो !" आणि सरळ ती झोपडीचं दार उघडून बाहेर निघते -" ए लडकी, बाहर मत जाव, खतरा है -" वगैरे ती काही ऐकत नाही - या दोघी घाबरून दार लावून घेतात - रानी बाहेर पडल्यावर एका झाडाच्या बाजूनं पुढे होते - एका भिंतीच्या कडेकडेनं पुढे जाऊ लागते - इथं फिल्म कट् ! लाईटस्, लाईटस् ! यानंतर पुन्हा जी फिल्म सुरू होते तेव्हा रानीला कुणीतरी सांगतं की अमुक अमुक बँकेवर आज दरोडा पडणार आहे - ठीक आहे - रानी निघते - बँकेच्या समोर काही अंतरावर दबा धरून बसते - दरोडेखोर येतात - बँकेत जातात - मागोमाग रानी मधलं अंतर कापून बॅकेत जाते - फिल्म कट् ! लाईटस् लाईटस् ! असं ऐन मोक्याच्या वेळी तुटलेली फिल्म पाहून पब्लिक इतकं चवताळलं म्हणून सांगू ! अक्षरशः दगडफेक झाली - पडद्याच्या चिंध्या झाल्या आणि लोकांना पैसे परत द्यावे लागले ! ठीक ? आता नंबर दोन --

रवीः विजय ! कमॉन !

विजयः एवढी दहशत निर्माण करणारा दादा कोण आहे ते बघायला डॅनी त्या भागात आलेला असतो. गुत्त्यावर दारू पीत असतो. ( हे सगळं सांगण्यात याला स्वतःला इंटरेस्ट नाही - रुक्षपणा - ) तिथं शेट्टी येतो. तो डॅनीला विचारतो," कौन हो तुम ?" डॅनी म्हणतो," समझो तुम्हारा बाप !" शेट्टी त्याला म्हणतो, " चले जाव यहाँसे -" डॅनी काही बोलत नाही - ग्लास उचलतो. तेवढ्यात शेट्टी पुढे येतो आणि डॅनीच्या हातातला ग्लास उडवून लावतो. डॅनी तोंडावर उडालेले दोन थेंब पुसतो. शांतपणे वळतो. पुढे येतो. काडेपेटीतनं काडी काढून शेट्टीच्या टकलावर घासून पेटवतो आणि टाकून देतो. " तूने खुद अपनी

मौतको ललकारा है टकले !" म्हणतो आणि एऽकच देतो ठेवून की शेट्टी भेलकांडत जाऊन पडतो. मग मारामारी होते. अर्थात् शेट्टी हरतो. ( थांबतो. )

रवीः झालं ?

विजयः हो.

रवीः एवढा सनसनाटी प्रसंग -- पण सपक केलास तू ! ऑल राईट -- नंबर तीन !

संगीताः मी.

विजयः मघाशी प्रभावहिनी सांगत असताना ही थोडंसं हसली नं तेव्हा मला तिची इतकी दया आली ! मन भरून आलं ! खरं म्हणजे माझ्या मनात चांगल्या भावना आहेत हिच्याबद्दल --

रवीः मान्य ! नंबर तीन - संगीतावहिनी !!

संगीताः शेवटचाच सीन असतो. न्यायमूर्ती म्हणतात, " इस मुकदमेके कारोबारसे यह साबित होता है कि अजय बेगुनाह है और असली कातिल मर चुका है ! इसलिये यह अदालत अजयको बाइज्जत रिहा करती है ! और असली कातिल तो मर चुका है इसलिये उसे सजा- ए - मौत देनेका सवालही नही उठता ! " पाच ठोके पडतात. कोर्ट उठतं -- मग " अजय ! " म्हणून सुजाता त्याच्याजवळ येते - अजय, " सुजाता ! माँ ! दीदी ! " म्हणतो. मग शेवटी पहिल्यांदा एकदा होऊन गेलेलं आनंदीटाईप कुठलंतरी गाणं - त्यातला चेहऱ्यावर हास्य असलेला भाग पुन्हा दाखवतात. मग -- द एन्ड !

रवीः व्हेरी गुड ! आता नंबर चार ! म्हणजे मीच ! तर अशी डोंगराच्या वरच्या साईडनं माँ ओरडत चाललेली असते -- " रुक जाव रमेश, रुक जाव ! रुक जाव रमेश, रुक जाव !" खालच्या रस्त्यावरनं रमेश कारमधून चाललेला -- " सुनो रमेश ! रमेश, रुक जाव !" पण कुठलं काय ! तो जातोच पुढं ! तो डायरेक्ट येऊन मोहनच्या पुढेच उभा ठाकतो ! मग ही ऽ मारामारी त्यांच्यात ! अशी थोडा वेळ मारामारी झाल्यावर माँ आणि इतर दोनचार लोक दुसऱ्या कारमधून नेमके येतात. माँ पळत पुढे येते - मधे पडते - " रुक जाव रमेश ! ये मोहन तेरा भाई है और तुम्हारे पिताजीका कत्ल विक्रमने किया है !" "क्या ! " जरा आश्चर्य वगैरे. मग " भैया !" "माँ ! " गले लगना - वगैरे . मग दोघं मिळून विक्रमवर चाल करून जातात. त्याची शेकडो माणसं आणि निरनिराळ्या प्रकारची मशिनरी हाणून पाडून शेवटी विक्रमला हाल हाल करून खलास करतात. त्यानं नीला या हिरॉईनला कोंडून घातलेलं असतं, तिला सोडवतात. मग अर्थातच शेवट गोड होतो.

प्रभाः मजा आली नं संगीता !

संगीताः हो ना !

विजयः शेवट गोडच व्हायला पाहिजे पण !

रवीः म्हणजे पुन्हा कटकट नसते रे ! द एण्ड ! घरी जा, जेवा आणि झोपा !

प्रभाः करमणूक नसली तर फार बोअर होईल !

विजयः बरं, आम्ही निघू का आता ?

रवी : अरे, थांबा जरा, जा जरा वेळानं --

विजय : का ? का ?

रवी : आपण कितीही मोकळेपणानं बोलत असलो ना तरी मनाचा एक भाग सारखा अडवाअडवी करत असतो -- त्यामुळं कितीही बोललं तरी अजून खूप बोलायचं राहिलंय असं वाटतं -- तुम्हाला नाही येत असा अनुभव ?

प्रभा : मलाही वाटतंय, काहीतरी महत्त्वाच बोलायचं राहिलंय ! तुला संगीता ?

संगीता : खरं आहे -- बोलू या अजून --

रवी : प्रभाच्या अपेक्षा माझ्याकडून भंग पावत होत्या हे मी कबूल करतो पण त्याचा परिणाम म्हणून तिनं माझ्याशी असं वागणं हे म्हणजे सूड उगवणं झालं -- हे प्रेम तर नक्कीच नाही --

प्रभा : पहिला कबुलीचा भाग चांगला आहे पण सूडाचं चूक आहे -- ते तसं वागलं जातच होतं माझ्याकडून --

विजय : मी सुध्दा संगीताशी सूडभावनेनं वागत नाहीच ! --

संगीता : मीही मुद्दाम वागत नव्हतेच -- एखाद्या पुरुषाला माझं आकर्षण वाटल्याचं लक्षात आलं की लगेच मला सनसनाटी वाटायचं -- प्रतिसाद दिलाच जायचा--

विजय : हो, पण मुद्दाम कुणीच वागत नाही म्हणजे सगळ्यांचंच बरोबर आहे असं आहे का काय ?

संगीता : माझ्या मनात एक प्रश्न येतोय --

प्रभा : बोल, बोल --

संगीता : अपेक्षा बाळगणं, त्या भंग होणं, चिडणं, सूड घेणं, अपराधी वाटणं, त्रासिक वाटणं आणि सगळ्यांची सारखी तडफड होणं -- हे सगळं जर चूक असेल तर बरोबर जगणं म्हणजे काय मग ? ( शांतता.)

विजय : सगळंच चूक म्हणून स्वतःच्या चुका त्यात मुरवून टाकणं झालं हे !

प्रभा : प्रश्न काय चुकीचा आहे तिचा ?

विजय : समाज असणं हाच प्रॉब्लेम आहे !

रवी : म्हणजे संपलं ! खास, विशेष, खोलातलं असं बोलण्यासारखं आपल्याकडे काही नाही --

विजय : आहे असं नुसतं वाटत असतं आपल्याला --

प्रभा : त्यापेक्षा ज्याच्या मनात कोणताच त्रासिकपणा नाही त्यानं हात वर करायचा - असं करू या --

रवी : कोणताही वेडपटपणा नकोय ! प्रश्न मार्गी लागलेत हेच चांगलं आहे -- तिथं पुन्हा तपासणी नकोय --

विजय : बरं, आम्ही निघू का आता ?

रवीः मी सांगतो, तुला तुझ्या बायकोची खाजगीत समजून काढायचीय - तिच्या मनाला गंभीर इजा तर झालेली नाही ना याची काळजी वाटतीय तुला - तिला कसं समजवावं आणि तिचा चेहरा पहिल्यासारखा मोकळा, हसरा कसा करावा - या विचारानं अधीर झालायस तू - बरोबर ?

विजयः बरोबर आहे. पण याचा अर्थ तिनं कसंही वागलं तरी चालेल असा नाही. ती मला अपमान वाटेल असं वागली की संताप होणारच माझा. मी तिच्याशी चांगलं वागायचा, सहानुभूतीनं, प्रेमानं तिला समजवायचा प्रयत्न केला याचा अर्थ तो अपमान आता मी चालवून घेतला असा तिनं करता कामा नये . मी फक्त माझ्या संतापावर तात्पुरती मात करतोय. आणि तिनं जर का तिच्या स्वभावाला मुरड घातली नाही तर माझ्या चांगल्या वागण्याचा अर्थ - मी अपमान चालवून घेईन - असा तिनं लावलाय-- असं मी समजणार - मग जे काय होईल ते होईल ! --

रवीः बोल, संगीतावहिनी, येतंय का लक्षात ?

संगीताः येतंय ना - असा प्रश्न परत येऊच नये असा मी आठवणीनं प्रयत्न करीन --

विजयः ' प्रयत्न करीन ' असं म्हणणंसुध्दा अपमानास्पद आहे --

संगीताः ( मान खाली घालून -- ) माझ्या वागण्यातला तो एक पोरकटपणा होता -- आणि अनुभवानं शिकत नाही का माणूस ?

रवीः विजय, हा सगळा गोंधळ संपूर्णपणे नाहीसा होईल आणि एक अगदी नवीनच जीवन उदयाला येईल असं काही समजू नको - गेली कित्येक वर्षं मीसुध्दा असंच डोकं आपटतोय --

प्रभाः आपलं काही काढायची गरज आहे का ?

रवीः आपला स्वभाव आपल्याला टिकवायचाही आहे, त्याला मुरडही घालायची आहे, दुसऱ्याच्या स्वभावाबद्दल सहानुभूतीही ठेवायची आहे आणि संतापही ठेवायचा आहे - असं तोल सावरत जाईल तितकं जाईल -

विजयः कंटाळवाणं आहे पण हे !

रवीः त्याला इलाज नाही - हे बहुतेक सगळं अनैसर्गिकच असावं - हा गोंधळ नाहीसा होण्याचा मार्ग याच्यातच कुठंतरी असावा पण तो आपल्याला सापडलेला नाही - कदाचित् असा मार्ग शोधायची आपली अनैसर्गिक धडपडच मोठा अडथळा होत असेल - जेव्हा हे कळून येतं की आपली धडपड, आपले प्रयत्न यातून एक गोंधळाचीच साखळी विणली जातीय आणि संघर्ष-विरहित असं त्यातून काही निघत नाहीय तेव्हा खरंच असं वाटतं की, नाही, आपल्याला काही समजत नाहीय - आपली प्रत्येक कृती विकृत आहे, डागाळलेली आहे... एक क्षणभर थांबावं... एकच क्षण का होईना, पण थांबावं... ( काही क्षण शांतता. मग दारावरची बेल वाजते. रवी जाऊन दार दघडतो. लक्ष्मणराव.) या,या !

लक्ष्मणरावः आज पंधरा दिवस पूर्ण झालेत म्हणून मी आलेलो नाही -- मी एका वेगळ्याच कारणासाठी आलोय -- वारुळांतून निघालेले नाग पुन्हा कधीतरी वारुळांत जातातच --

रवी : म्हणजे ? आम्ही तर उलट वाटच बघत होतो तुमची -- खूप चांगले बदल झालेत !

लक्ष्मणरावः छानच आहे -- पण मी या सगळ्या प्रकारातून माघार घेतोय --

प्रभा : म्हणजे ? आम्ही तर आभार मानणार आहोत तुमचे --

लक्ष्मणरावः इतक्या वर्षांत माझ्या हातून जे कधी घडलं नव्हतं ते काल घडलं -- मी माझ्या बायकोला दोन

मुस्काडीत लगावल्या --

विजय : का ?

रवी : खरंच नाही वाटत ! उलट तुम्हाला कसं एवढं शांत राह्यला जमत असेल अशी चर्चा करायचो आम्ही ! खरंच !

लक्ष्मणरावः पण मी म्हणतोय ते खरं आहे -- आणि कशाला खोटं बोलू ? --

रवी : काय झालं काय पण एवढं ? तुम्हाला इतकं संतापायला लावणं कसं काय जमलं त्यांना ?

विजय : की यांना संतापणं जमलं ?

प्रभा : ( विजयला -- ) भाऊजी -- असलं नकोय हं काही --

रवी : जरा त्यांचं ऐकाल का ? ( सगळे लक्ष देतात -- )

लक्ष्मणरावः तिचं म्हणणं काय, म्हणे मी नवरेपणानं वागतच नाही तिच्याशी ! तिच्याबद्दल माझ्या डोक्यात विचारच कमी असतो ! आम्हाला जी मुलं झाली तेवढाच माझा नवरेपणा तिला मिळाला -- माफ करा हं, ती असंच म्हणाली -- मी तिच्यावर चिडत नाही, संतापत नाही, एवढंच नव्हे तर इतर नवऱ्यांसारखं तिला मारत नाही, त्यामुळं इतर बायकांपेक्षा ती एकटीच वेगळी पडते असं तिचं म्हणणं! एवढी वर्षं माझं हे असलं तिच्याकडचं दुर्लक्ष सहन करावं लागल्यामुळं ती मनातनं दुःखी असते असं तिचं म्हणणं ! मलाही वाटायचं बरं का की तिचा काहीतरी प्रॉब्लेम असावा, पण मी मनात म्हणायचो की असेल ! नाहीतरी कोण कुठं आनंदी असतं ! उगीच खाजवून खरूज कशाला काढा !

रवी : अवघडच आहे !

लक्ष्मणरावः तर तिचं म्हणणं आता हे मला म्हणजे तिला सहन होणार नाही ! माझ्या जगावेगळं वागण्यामुळं तिचं आयुष्य दुःखाचं झालं म्हणाली ती !

रवी : म्हणून मारलं ? हे दुःख घालवण्यासाठी ?

प्रभा : नवरा सारखा चिडतो, मारतो म्हणून दुःखात राहणं एक वेळ ठीक आहे --( संगीताला, एका बाजूला - ) मी तुला नवऱ्याच्या चिडण्याचा एक नियम सांगितला होता, आठवतोय ? तो चिडतोय ते एका दृष्टीनं चांगलंच असतं कारण याचा अर्थ तो आपल्यालाच सुधारायच्या प्रयत्नात असतो - पण याचा अर्थ असा नाही की तो चिडण्याचा त्रास, दुःख होत नाही -- ते होणारच -- कळलं ना ?-- पण यांच्या बायकोला हवं होतं ते दुःख !-- कळलं !-- ( पुन्हा दोघी लक्ष देतात - )

लक्ष्मणरावः माणूस या प्राण्याबद्दल काहीही गृहीत धरता येत नाही ! मला काहीही कळत नाही हे मला आज पुन्हा एकदा कळलं !

विजय : हे जितक्या जास्त वेळा कळेल तेवढा माणूस जास्त अनुभवी आणि शहाणा !

लक्ष्मणरावः मला लोक काय समजतात आणि काय ही माझी अवस्था ! याचा चडफडाट झाल्यामुळं माझा तोल गेला आणि मी तिला मारलं !

विजय : एवढं गुंतागुंतीचं ! इतक्या अडाणी लोकांत ! कान्ट इमॅजिन !

लक्ष्मणरावः एसएससी झालोय ! आणि मन आहे पण गुंतागुंत नाही असं होऊ शकत नाही --

विजय : हां हे तर आता आमच्याही लक्षात आलंय --

लक्ष्मणरावः मी तरी कुठे वेगळा आहे ? -- म्हणून -- म्हणूनच तुमचे पैसे परत द्यायला आलोय --( खिशात हात घालतो.)

रवी : (लक्ष्मणरावना थांबवत -- ) उलट आमचे तर प्रॉब्लेम मिटलेत ! तुमच्या त्या यंत्रानं छान जादू केलीय ।

विजय : आणि पैशांचा काय मोठा प्रश्न आहे ! पैसे ते किती !

लक्ष्मणरावः असं म्हणू नका -- मला खरं वागू द्या !

प्रभा : आणि आम्ही खरं नको वागायला ?

विजय : हा आहे मात्र प्रॉब्लेम !

रवी : तुमच्या नकळत, तुमच्यामुळं काही चांगलं घडलं तर तुमची काही हरकत आहे ?

लक्ष्मणरावः काय घडू शकतं चांगलं ? मी तर अंधारात चाचपडतोय --

रवी : मनाचे वागायचे प्रकार समजणं हे चांगलं नाही ? आणखी काय हवंय ? संदेश हवाय ? इतकी अगदी लहान मुलं आहोत का आपण ?

लक्ष्मणरावः बरं, पैसे परत घ्या आणि मला जाऊ द्या ! -- ( खिशातून शंभराच्या दोन नोटा काढून देत, विनवत -- )

ऐका माझं ! --

रवी : बरं, ठीक आहे, लक्ष्मणरावांच्या भावनेचा आदर करू या आपण ! --

विजय : हं, ठीक आहे, हेही ठीक आहे --

रवी : ( पैसे परत घेत --) परत घेतोय -- कृतज्ञतेपोटी ! --

विजय : कृतज्ञतेपोटी देतात -- घेत नाहीत !

रवी : नक्की काहीच असू शकत नाही, कारण -- मन !

लक्ष्मणरावः ठीक आहे, मी जातो -- ती आपली फ्रेम द्या काढून -- यांची नंतर द्या -- आणि लक्षात ठेवा, कुठलीही, पुन्हापुन्हा चालणारी जादू नसते ! -- बाहेरच्या कुबड्या फक्त एखाद्या वेळी चालू शकतात, पण तोल आपला आपणच सावरायचा असतो -- ( रवी ती फ्रेम काढून देतो. ती घेतो आणि क्षणभरानं जातो. )

विजय : च्यायला गंडवलं का काय ! पैसे परत देऊन गेला !

रवी : पैसे घेतले तर गंडवलं म्हणता येतं -- दिले तर नाही ! ( एक नोट आपल्या खिशात, एक विजयच्या खिशात घालतो. )

विजय : हेही नक्की नसणारच ! -- मन !

रवी : बरं, ते ठीक आहे आता सगळं, पण, जाण्यापूर्वी -- चहा घ्यायचा ?

विजय : नको, नको, तू मुद्दाम म्हणतोयस -- संगीता, चल ! --

प्रभा : अरे पण --

विजय : आता तुम्ही या आमच्याकडे । अच्छा ! ( निघतो -- )

संगीता : बरंय -- ( जातात.)

रवी : ( प्रभाला -- ) बरं, मग आपण ? घ्यायचा चहा ?

प्रभा : हो, आणते -- ( गतिमान संगीत, प्रकाश -- दोन क्षणांत ती आत जाऊन चहा घेऊन येते -- रवी सिगरेट शिलगावण्याच्या बेतात -- त्याचे लक्ष नाही -- क्षणभरानं अत्यंत मऊ, मुलायम आणि प्रेमळ आवाजात -- ) आणलाय -- चहा -- ( कपबशी त्याच्यासमोर धरते -- तो चकित -- )

रवी : इतका कसा काय बदल ? --

प्रभा : तुम्ही इतके बदलताय, मलाही नको का प्रयत्न करायला ? ( प्रेमळ स्मित. )

**-- पडदा पडत जातो --**

**समाप्त**



पत्ताः-- चं.प्र..देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.,.
वीर सावरकर मार्ग,सहकारनगर नं २,
पर्वती, पुणे ४११००९.

**दूरध्वनी : २४२२७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**